श्री.

मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें.

महाराष्ट्रकाव्यग्रंथ.



१४.

# स्फुटसंग्रह,

## भाग दुसरा.

जुन्या हस्तलिखित प्रतींच्या आधारें

विनायक लक्ष्मण भावे, बी. एस्‌सी;

यांनीं.

‘महाराष्ट्रकवि’ या मासिक पुस्तकांत

छापून प्रसिद्ध केला.




शके १८२९.

## 'स्फुटसंग्रहां'त आलेल्या प्रकरणांची अनुक्रमणिका.







# *रामजन्म.

## श्लोक.

गुरु गणेश सरस्वति मस्तकीं । सहित साधुसमूह समस्तकीं ॥
नमुनि जोडुनियां द्वयहस्तकीं । कथिन रामकथा हृदयस्थ कीं ॥ १ ॥

स्वसुख भावुनि शंभु जपे सदा । न विसरे स्मरणीं नत सर्वदा ॥
गुज भवानिसि तें उपदेशिलें । निजसुखेंचि हलाहल सोशिलें ॥ २ ॥

निवृत्ति गातां सुखसंभ्रमासी । संसाररोगांतक साधकासी ॥
आकर्णितां रंजक भाविकांसी । हीना पशुघ्नाविण कोण त्रासी ॥ ३ ॥

तोचि राघव-कथा अविनाशी । ऐकतांचि कलि-कल्मषनाशी ॥
भुक्ति मुक्ति अधिकारपरत्वें । साधका फलद निर्मळ सत्वें ॥ ४ ॥

दशरथ रविवंशीं जन्मला पुण्यराशी ।
विबुध मुनि पुराणीं वर्णिती ज्या नरासी ॥
सदयहृदय चित्तीं सर्वदा भूतमात्रीं ।
अनुदिन रत शास्त्रीं नातळे दोष गात्रीं ॥ ५ ॥

हरिगुरुसम लक्षी साधुमार्गा निरीक्षी ।
चतुर उभयपक्षीं लक्षणें युक्त साक्षी ॥
अधिगतपरमार्थी सांपडेना अनर्थीं ।
दशरथ पुरुषार्थी ख्याति झाली यदर्थीं ॥ ६ ॥

विदितसकलविद्या वीरशार्दूल राणा ।
अनुपम शरयुद्धीं नाकळे शौर्य कोणा ॥
अनुकुळ सकलार्थीं एक चिंता प्रजांची ।
अनुदिन मन तेणें राजयालागीं जांची ॥ ७ ॥

---

* हा ग्रंथ प्रसिद्ध दासपंचायतनांतले रंगनाथस्वामी निगडीकर यांचा आहे. हा त्यांचे वंशज रा. रा. **अनंत गणेश निगडीकर** यांचेकडून मिळाला. मूळ प्रत आमचेपाशीं नसल्यामुळें प्रतीसंबंधें जास्त माहिती देतां येत नाहीं.

एके दिनीं वनविहार रिघे कराया ।
तों नाढळे मृगसमूह कदापि राया ॥
झाली निशी धरित एक तडागपाळी ।
तों पातलें विधिबळें लिहिलें कपाळीं ॥ ८ ॥

स्कंधीं पिता घेउनि पूर्ण अंधा । वाराणसीहुनि निघे सुत सेतुबंधा ॥
दे श्रावणा उदक मागत रात्रिभागीं । गेला तडाग अनुलक्षुनियां सवेगीं ॥९॥
झारी भरी निजकरीं द्विज अंधकारीं । कानीं निनाद पडतां नृप बाण मारीं ॥
भेदे उरीं हरि हरी हरि हांक मारी । देईल कोण उभयांस सवेग वारी ॥१०॥
हा हा ह्मणोनि धरणीवरि अंग टाकी । लक्षूनि तो विकल राव निमग्न शोकीं ॥
बोले द्विजेंद्र न चुके भवितव्य राया । धाता परंतु न शकेचि दुजें कराया॥११॥
पाजूनि तोय उभयांसि न बोल कांहीं । जैं जाणवे त्वरित टाकिति देह पाहीं ॥
संकेत दाउनि कलेवर शीघ्र सांडी । राजा स्मरोनि शिवशंकर देत मांडी॥१२॥
जसा गुंतला हंस आकंठ पंकीं । स्मरेना दुजें सत्व तो मग्न शोकीं ॥
जळें पूर्ण झारी नृपें वेग केला । मुखीं लावितां विस्मयापन्न झाला ॥ १३ ॥
ह्मणे श्रावणा कां उदासीन चित्तें । न बोलोनि देशी कसा जीवनातें ॥
मुखें वक्र केलीं समाधान नाहीं । दिशा वाटती राजया वोस दाही ॥ १४ ॥
वदे पुत्र झाला असे स्वर्गवासी । त्यजा शोक चालेचिना यत्न त्यासी ॥
विवेकें श्रुतीशास्त्रपंथा पहाहो । हरीचिंतनें पूर्ण धैर्यें रहाहो ॥ १५ ॥

दशरथ अभिधानें जन्मला सूर्यवंशीं ।
नगर तरि अयोध्या पातलों पारधीसी ॥
दिनकर गत झाला स्थीर झालों तडागीं ।
उचित मज असे कीं राजधर्म प्रसंगीं ॥ १६ ॥

गुणीं बाण लावोनियां अंधकारीं । मृगें लक्षितां पातला ब्रह्मचारी ॥
भरी तोय जेव्हां वदे शब्द झारी ।तया नाद वेधेंचि मी बाण मारीं ॥ १७ ॥
स्मरे शंकरा तो पडे शब्द कानीं । त्वरें धांवलों सन्निधानीं निदानीं ॥
तृषाक्रांत माता पिता तोय देणें । वदोनी गिरा सांडिला प्राण तेणें ॥ १८ ॥
त्यानंतरें श्रावण-मात-तातें । खेदें बहू आठविलें सुतातें ॥
संतप्त शोकें वचनें अनेकें । बोलोनि ते लोळति लिप्त पंकें ॥ १९ ॥
झाले जसे क्लेश विशेष आह्मां । त्यां पावसी निश्चित दुःखधामा ॥
राया धरी शाप अचूक ऐके । यमालया जासिल पुत्रशोकें ॥ २० ॥
प्राणप्रयाणासि क्षणार्धमात्रें । करूनियां टाकियलीं स्वगात्रें ॥
त्यांची क्रिया सारुनि सांग रायें । ह्मणे अहा मी ठकलों अपायें ॥ २१ ॥

तों आठवे कौतुक राजयाला । या शापवेशें मज लाभ झाला ॥
संतान झाल्यावरि शाप बाधी । पाठी पिडा प्राप्त निधान आधीं ॥ २२ ॥
ससैन्य राजा नगरासि आला । समग्र लोकीं अभिवंदियेला ॥
त्या आदरें वंदुनियां वसिष्ठा । केली पुजा सत्वर एकनिष्ठा ॥ २३ ॥
सांगे तया वृत्त यथाविधीचें । तो बोलिला निर्मित हें विधीचें ॥
स्वकर्म तें खातरि पालटेना । न भोगितां किंचितही सुटेना ॥ २४ ॥

झाला अनर्थ नगरीप्रति आणि देशीं ।
विख्यात नागभुवनीं अमरावतीसी ॥
हत्या त्रयें करुनि दोष विशेष झाले ।
कोपेंकरून अमरेंद्र विरुद्ध बोले ॥ २५ ॥

शुक्रासि बोधुनि निरोधुनि मेघमाला । स्वर्गाधिपें बहुत कष्टविलें नृपाला ॥
आल्या प्रजा शरण दाविति खेद राया । सक्रोधरूप मग युद्ध निघे कराया ॥ २६ ॥
रथीं बैसवी आदरें कैकयीला । असे शुक्र तेथें अतीशीघ्र आला ॥
वदे रोधिला मेघ कां सांग मातें । न पावे श्रमा शीघ्र जा आश्रमातें ॥ २७ ॥
न मानूनि बोला ह्मणे राजयाला । वृथा जल्पसी बोल हे कासयाला ॥
अवेशें तदा राव तो बाण सोडी । बळी शुक्र बाणें क्षणार्धींचि तोडी ॥ २८ ॥

दशरथरथअंकालागिं हो थोर शुक्रें ।
करुनि बळ सरोषें भग्न केलें स्वचक्रें ॥
नृपवधु मग तेथें हस्त योजी प्रयत्नें ।
तृणवत तनु केली स्वामिकार्यास तीणें ॥ २९ ॥

परम हरुष राया मानिली प्रीय जाया । अनुकुल तुज चित्तें मागसी तें कराया ॥
नमन करुनि भार्या बोल बोले तथास्तु । समय उचित तेव्हां प्रीय मागेन वस्तु ॥ ३० ॥

परस्परें युद्ध अपार केलें । न देखिलें कीं श्रुतही न झालें ॥
पराक्रमी शुक्र प्रसिद्ध जाणा । दुजा रवींवंशज वीर राणा ॥ ३१ ॥

मग दशरथरायें विक्रमें युद्ध भारी । करुनि भृगु–सुतातें आणिलें पूर्ण हारीं ॥
द्विरद–समुह जैसा सिंहधाकें पळाला । त्यजुनि रण सवेगें शुक्र तैसा पळाला ॥ ३२ ॥
करुनि यश अयोध्याधीश चित्तीं विचारी । विकल नगरवासी देशदेशाधिकारी ॥
दुमदुमित दमामा चालिला हो स्वधामा । सुरवरनर तोषें वर्णिती कीर्तिधामा ॥ ३३ ॥
दशरथ यश — — — ७ — चित्र झाली । सकळ सुरसमाजीं वार्तिकीं कीर्ति नेली ॥
हरुनि सुरपतीतें पौरुषें शीघ्र आला । अरुढवुनि विमानीं थोर उत्साह केला ॥ ३४ ॥
विशेष बंदीजन कीर्ति गाती । देती अशीर्वाद ऋषी द्विजाती ॥
नेऊनियां तो अमरावतीला । सिंहासनीं उत्तम बैसवीला ॥ ३५ ॥

बृहस्पती 'स्वस्ति' वदे सुहास्यें । राजा वदे 'पावन मी त्वदास्यें' ॥
नमूनि इंद्रें गुरुवर्य यातें । सांगे नसे संतति राजयातें ॥ ३६ ॥
विभांडका आणुनि दीर्घ यत्नें । कीजेल जैं याग महत्प्रयत्नें ॥
होतील तैं पुत्र परोपकारी । चित्तीं धरी ज्यां त्रिपुरांतकारी ॥ ३७ ॥
बोले गुरू शीघ्र उपाय पाहा । चिंतानलें यासि बहूत दाहा ॥
विभांडकाचें मन ओकळेना । येईल कैसा मज हें कळेना ॥ ३८ ॥
वदत इंद्र उपाय सुचावला । उदित भाग्य तयासिच फावला ॥
मुनि विभांडक तन्मय जेधवां । हरणि शृंगऋषी सुत तेधवां ॥ ३९ ॥
देवांगना नेउनि चित्त वेधणें । आपूलिया लग्न करूनि बोधणें ॥
येईल तो शोधित पुत्र आपुला । लक्षूनियां होइल पूर्ण बापुला ॥ ४० ॥
सुरगुरुवचनाचीं अक्षरें कोण वर्णी । दशरथ निजनिष्ठे पूर्ण कर्णी अकर्णी ॥
अपरिमित सुवस्त्रें भूषणें रत्न माळा । अमरपति समर्पी आदरें हो नृपाळा ॥ ४१ ॥
देऊनियां कुंजर आणि वाजी । सुरेंद्र रायाप्रति हो नवाजी
शृंगानिमित्यें शत अप्सरांला । देऊनि धाडी नृपती गृहाला ॥ ४२ ॥
जिंकूनि शुक्र अति अद्भुत जो तपस्वी । झाला नृपाळ जगतांत महायशस्वी ।
उल्हास थोर नगरींत प्रजाजनांला । वंशीं विशेष वरपुत्र अजासि झाला ॥ ४३ ॥
संतोषयुक्त गजरें निज राजधानी । शृंगारिली सुवसनें बरवी प्रधानीं ॥
लंघूनिया गगनमंडळ कीर्ति गेली । यानंतरें परम पावन बुद्धि केली ॥ ४४ ॥
गेला वसिष्ठसदना नृपराज भेटी । साष्टांग वंदुनि वदे अति नम्र गोष्टी ॥
आज्ञा शिरीं धरुनि शुक्र समीप केला । भक्षावया द्विरद सिंह जसा भुकेला ॥ ४५ ॥

सत्कीर्ति केवल मुखें न कदां वदावी ।
वंचूं नयोचि सहसा म्हणे युक्ति दावी ॥
झाला प्रसंग जितुका निजवार्तिकांनीं ।
केला असेल तितुका श्रुत सर्व कानीं ॥ ४६ ॥

विशिष्ट कीं सूर्यकुळासि आला । वसिष्ठही सद्गुरु पूर्ण ज्याला ॥
जाणोनि इंद्रें बहु मान केला । बृहस्पती तुष्ट विशेष झाला ॥ ४७ ॥
झाले प्रसन्न वरि वंशपरंपराही । संयोजिली निकट देउनि अप्सराही ॥
हा सर्वही पदपदार्थ निवेदिलाही । आज्ञा समर्थ अपुली करणें मलाहो ॥ ४८ ॥
यानंतरें काय उपाय दावा । राजा पुसे निर्णय जी वदावा ॥
बोले वसिष्ठ कृतनिश्चय हा पहाहो । वाचस्पती वचन निर्णय शुभवाहो ॥ ४९ ॥
आणूनि शृंगऋषि लग्न करा विशेषें । येईल शोधित विभांडकपुत्ररोषें ॥
देखूनियां वधुवरा विभवें प्रशस्तें । संतोषरूप मख योजिल पुत्रहस्तें ॥ ५० ॥

– – ‿ – ‿‿‿ – ‿‿ – – – –

देवांगनासि विनवी नृप नम्र भावें । जावें त्वरें ऋषिवरासह शीघ्र यावें॥५१॥

नमुनि गुरु वसिष्ठा भावना एकनिष्ठा ।
धरुनि चपळ जाती राजयाच्या अभीष्टा ॥
त्यजुनि तनुज गुंफे तात गंगेसि गेला ।
तंव सुवरनितांनीं लाघवी खेळ गेला ॥ ५२ ॥
तळपत चपलांगें अंबरीं वीज जैसी ।
स्मर भरवुनि अंगीं शृंग केला विलासी ॥
सुरसरस विचित्रा नाचती स्वर्णगात्रा ।
भुलवुनि ऋषिपुत्रा चालती पद्मनेत्रा ॥ ५३ ॥
न भरत घटिकांहीं शृंग घेऊनि संगें ।
रिघति पुर अयोध्येमाजि नाट्यें सुधांगें ।
चपल नयनबाणें भेदिती अंतरंगा ॥
न लगत पळ पाडी व्याध जैसा कुरंगा ॥ ५४ ॥

अजतनय वरिष्ठा अंतरीं एकनिष्ठा । वदत गुरु वसिष्ठा स्वामिया ब्रह्मनिष्ठा ॥
मज तव वरदानें शृंग आला विभागा । त्वरित ऋषिविवाहा मंगलारंभ सांगा५५
ऋषी शृंग देवांगना अंतरंगीं । विरागी जसा गुंतला कामसंगीं ॥
नृपें अप्सरालागिं सन्मान केला । ऋषी शृंग तो अंगनांचा भुकेला ॥ ५६ ॥
ब्रह्मऋषी ऋषिराजसुतालें । थापटोनि करि सावध झालें ॥
अष्टदिशा अवलोकुनि पाहे । तों विपरीत दृशा गमताहे ॥ ५७ ॥
पाप तरीच विभांडक बापा । अंतरलों मज देइल शापा ॥
त्या परिसोनि सुपावन गोष्टी । शृंग अलिंगुनि तोष वसिष्ठीं ॥ ५८ ॥
बोलत राजनिधीप्रति जाणा । सत्वर घालुनि घाव निशाणा ॥
आणुनि ज्योतिषि पंडित शास्त्री । लग्नविसी घटितार्थहि गोत्री ॥ ५९ ॥
लावुनियां ऋषिलागि हरिद्रा । अर्पिती सूत्र कटीं करमुद्रा ॥ ६० ॥

मद–गज–गजरानें शोभती सिंधुरानें ।
क्वचित पुरविहारी धांवती एक राने ॥
बहुत सुटति यंत्रें घोषही विप्रमंत्रें ।
घणघणघण घंटा दीर्घ वाद्यें स्वतंत्रें ॥ ६१ ॥
द्विजवर निगमाचा मंडपीं घोष झाला ।
अतिसमय द्विजीं ॐ पुण्य हा शब्द केला ॥
धिमिधिमिकि नगारे दुंदुभी नाद वाद्यें ।
परमविधि विधानें दाविती गद्यपद्यें ॥ ६२ ॥

गगनभरि विनादें शब्द कोणी न जाणें।
चरित जगदिशाचें वार्णिजे येथ कोणें ॥
अघटित घटणा हे ईश्वरी मूळ माया।
त्रिभुवन घटयंत्रीं लाविलें तें भुमाया ॥ ६३ ॥

सारुनि कर्म विभांडक आला। स्नुषाचि लक्षुनि हर्ष गळाला ॥
योगबळें अनुलक्षुनि पाहे। शृंग अयोध्येप्रति गमताहे ॥ ६४ ॥
कोण अयोध्यानगरनिवासी। जाळुनि भस्म करीन तयासी।
चालतसे पवनाहुनि वेगें। दुश्चित मानस पुत्रवियोगें ॥ ६५ ॥
प्रज्वळला वडवानळ जैसा। येत विभांडक सांनिध तैसा ॥
मंगळ घोष पडे निजकर्णीं। विस्मितमानस घोष अकर्णीं ॥ ६६ ॥
पुसतसे पशुपाळ जनांला। उत्सव काय पुरीप्रति झाला ॥
शृंगऋषीप्रति आणुनि राजा। लग्न करी जठरार्तिहरा जा ॥ ६७ ॥
बोलति लोक विचित्रहि वाटे। देखिलियाविण साच न वाटे ॥
जाउनि पाहिन जीव जिवाचा। देइन राजविधीस सुवाचा ॥ ६८ ॥
वार्तिक सांगति विप्र गुणाचा। येत असे न कळे कवणाचा ॥
वाटत शेष सहस्रफणांचा। भाव गमे अरुणावरुणाचा ॥ ६९ ॥
होय विभांडक थोर ऋषेश्वर। आमुचिया सदनाप्रति आला।
दीन दयाकर केवळ शंकर चातक मी घन आपण आला ॥
भाग्य विशेष गमे सहसा गुरुराज वसिष्ठहि साह्य जयाला ॥
वानीति भाट अचाट नभीं ध्वनि दाशरथी रघुनंदन बोला ॥ ७० ॥
राजनिधी विनवी गुरुलागुनि येत विभांडक सन्मुख जावें।
येरु अवश्य वरोनि निघे अति सत्वर तो ऋषिसंनिध पावे ॥
राय करी अभिवंदन इष्ट वसिष्ठ विभांडक भेटति भावें।
येउनि वंदिति पाय वधूवर सत्वर शोक लयाप्रति पावे ॥ ७१ ॥
शृंग ह्मणे मज चाळविलें गगनींहुनि येउनियां वनितांनीं।
लाघव लावुनि संगित गाउनि रूपहि दावुनि लागति कानीं ॥
चाल सवेग खुणाविति बोलति मानस मोहिति पूर्ण निदानीं।
लग्नमिसें भ्रम मोहपिसें न सुटेचि असें सुचिलें सकळांनीं ॥ ७२ ॥
काय करूं वदतात सुनिश्चित होत नसे मज वाटत कांहीं।
हांसतसे ऋषिराज विभांडक जें लिहिलें न चुकेचि कदाही ॥
कर्म कलाप फलाशाविवर्जित टाकि अहंकृति सर्वहि पाहीं।
स्थीर करी मन पूर्ण सनातन तो जगजीवन चिंतुनि राहीं ॥ ७३ ॥

यावरि तो ऋषिराज विभांडक चित्त सुचित्त करी महा योगी ।
लागतसे चरणीं नृप दुश्चित इच्छित जेविं सदौषध रोगी ॥
व्याकुळ मीन जसा जलहीन तसा अति दीन मी सांग उपाया ।
थोर तपोनिधि केवळ तूं विधि काय विलंब वदे ऋषि राया ॥ ७४ ॥

ब्रह्मऋषीस विभांडक बोलत तूं सकलांत वरिष्ठ विवेकी ।
मानिति शासन इंद्र नरेंद्रहि सोम सूर्य धरणीधर जो कीं ॥
राजनिधी अति विव्हल मानस संततिवीण अभीष्ट नसे कीं ।
सार विचार करूनि अनुज्ञा वेद विधीवरि उत्तमश्लोकीं ॥ ७५ ॥
मानुनि तोष विशेष वसिष्ठहि बोलत धन्य ऋषी तव वाणी ।
थोर तपोबल निर्मल निश्चल पुण्य पवित्रहि शास्त्रपुराणीं ।
शृंग ऋषेश्वर याज्ञिक मुख्य करूनि किजे बहु यज्ञशिराणी ।
आवडलें मज उत्तम ही तुज याहुनि आन मनांत न आणी ॥ ७६ ॥

आज्ञा प्रमाण करणें मज एकनिष्ठा । बोले विभांडक ऋषी हरुषें वसिष्ठा ॥
आज्ञापिलें निकट सत्वर पुत्रराया । तूं योग्य यज्ञ विषयीं सहसा कराया ॥ ७७ ॥

यानंतरें शृंग तथास्तु बोले । आज्ञा शिरीं वंदुनि पूर्ण डोले ॥
सांगे नृपा सर्व पदार्थ आधीं । आणूनियां मंडपकुंड साधीं ॥ ७८ ॥
तो वीर पंचानन सूर्यवंशीं । यामार्ध मात्रेंचिपदार्थराशी ॥
करूनियां मूळ ऋषीस धाडी । ज्याचे भयें काळ मनीं धडाडी ॥ ७९ ॥
प्रधान पाचारुनियां सवेगें । कर्तव्य तें राजविधान सांगे ॥
बोलाविजे सर्व ऋषेश्वरांतें । जे प्रीयपात्रें परमेश्वरातें ॥ ८० ॥
वसिष्ठादि सप्तर्षि मुख्य जाणा । अगस्ति दुर्वासहि व्यास आणा ॥
कौंडिण्य मैत्रेय पराशरातें । शांडिल्य भृगु (?) उद्दालकातें ॥ ८१ ॥
शुका वाल्मिका नारदा वामदेवा । ऋषी अंगिरा गर्गचार्या सदेवा ॥
समस्तांसि आणूनियां यज्ञ कीजे । प्रतिष्ठानरूपें पुजा मान दीजे ॥ ८२ ॥

सकल मुनिवरांतें आदरें सुप्रभावें ।
नमन दशरथेंही दीर्घदंडें स्वभावें ॥
करुनि मज दया हे शीघ्र यज्ञासि यावें ।
वरद परमपोष्यालागिं देऊनि जावें ॥ ८३ ॥

दिग्मंडळींच्या नृपतींस पत्रें । यथाक्रमें लेहुनियां विचित्रें ॥
पाचारिजे आदरयुक्त राजे । महत्त्व जेणें बहुधा विराजे ॥ ८४ ॥

अत्यादरें दशरथें वर राजयांतें । केलें प्रणम्य मख सांग करावयातें ॥
यावें त्वरें सकल घेउनि आप्तलोकां । होईल उत्सह निका नयनीं विलोका ॥ ८५ ॥

जाती स्वरें सेवक पत्र हातीं । घेऊनि ते रायमुनी पहाती ॥
स्वसंपदे संनिध सिद्ध होती । मानूनियां तोष समस्त येती ॥ ८६ ॥
मृदंगवाद्यें सह सर्व सेना । अपूर्ण कांहीं सहसा दिसेना ॥
उद्दाम अश्वादि रथी पदाती । परस्परें कौतुक दाविताती ॥ ८७ ॥

शाटी दंड कमंडलादिक करीं व्याघ्राजिनें शोभले ।
ज्यांचीं तीव्र तपें प्रदीप्त अमुषें चंद्रार्क तेजें भले ॥
शापानुग्रहआग्रही निजबळें जे सृष्टिकर्ते ऋषी ।
आले सर्व समीप राजनगरा यागार्थ तो मानसीं ॥ ८८ ॥
सामुग्री कुशदर्भ शुद्ध समिधा पात्रें चरूचीं बरीं ।
कुंडें मंडप वेदिका स्रुक् स्रुवा यज्वा पवित्रें करी ॥
सर्वें सिद्ध समागमें मुनिजनां ऐकोनि राजा मनीं ।
तोषें बोलत हेतु पूर्ण घडला पुत्रोत्सवा कामिनी ॥ ८९ ॥
अष्टौ प्रधानांप्रति भूप बोले । समीप सर्वें ऋषिराज आले ॥
अत्यादरें संन्मुख शीघ्र जावें । घेऊनि यावें विभवें पुजावें ॥ ९० ॥

मंत्री वसिष्ठ गुरु भूप ससैन्य गेला । साष्टांग वंदुनि मुनीप्रति बोलियेला ॥
आदित्यवंश अमुचा कृतकृत्य झाला । तीर्थें व्रतें तपसमुच्चय आजि आला॥ ९१ ॥

मी धन्य धन्य मज दैन्य नसे त्रिवाचा ।
मी लाधलों वर सुनिश्चित माधवाचा ॥
सर्वें तथास्तु वदती कृतनिश्चयानें ।
पूजूनि रम्य दिधलीं सकळांसि यानें ॥ ९२ ॥

तैसेचि राय मग पूजियले प्रधानीं । आनंदरूप निघती मग राजधानी ॥
गेले नृपाळ सदना गुरु राजयाचा । चेती फणींद्र रविही बचनें जयाच्या॥ ९३ ॥

पृथक पृथक सर्वां रम्य विश्राम धामें ।
करुनि विधिविधानें स्वर्गतुल्यें अरामें ॥
भरुनि सकळ पूर्णा वस्तु नाना विशेषें ।
नृपति मुनिसमूहा तोषवीलें अशेषें ॥ ९४ ॥

सकल मुनिजनांच्या संमतें श्रीवसिष्ठें । समय उचित वाक्यें बोलिला जें विशिष्टें ॥
दशरथ नृपतीनें संततीच्या अभावें । सुरगुरुवचनें हा मांडिला यज्ञ भावें ॥ ९५ ॥

ऋषी शृंगहस्तेंचि संपूर्ण कीजे । अनुज्ञा रुपायुक्त होऊनि दीजे ॥
समस्तांस तें मानलें ते प्रसंगीं । करा शृंगहस्तें मुनी विप्रसंगीं ॥ ९६ ॥
यज्ञ क्रिया वेद विधिप्रमाणें । विभांडकाचा सुत सर्व जाणे ॥
प्रयोजितां मंडप कुंड तेणें । संतोषले शिष्ट विशिष्ट जेणें ॥ ९७ ॥

मध्यें सडे कुंकुमकेशरांचे । विलासती पुंज धरामरांचे ॥
यज्ञार्थ साह्यार्थ पदार्थजाती । अपूर्ण ना बोलति हें द्विजाती. ॥ ९८

ऋषिशृंगें तेव्हां जनकपद माथां प्रणमिलें; ।
मनें, वाचा, काया, गणपति तथा शंभु नमिले. ॥
वसिष्ठाचें भाळीं पद नमुनि साष्टांग, सकळां ।
ऋषीवर्यां सांगे, करुनि करुणा, याजनकळा. ॥ ९९

ऋषी सर्वें वक्त्रें वदति, ' तुज सामर्थ्य दिधलें; ।
करावी ना चिंता; दशरथकुळीं होइल भलें. ' ॥
प्रसादें या, राया बहुत गमला उत्सह मनीं; ।
ऑरंभी यज्ञातें, सकळमुनिपादाब्ज नमुनी. ॥ १००

शतश्लोकीं ऐसा दृढतर अभिप्राय घडला. ।
जसा राहोतें हो दुरि करुनि भानू उघडला, ॥
निजानंदें तेव्हां दिनकरकुळीं रंग भरला. ।
कथा श्रीरामाची प्रमित प्रथमाध्याय सरला. ॥ १०१

---

## अध्याय दुसरा.

येरे दिनीं ऋषि समस्तहि, नित्यकर्में । सारूनि वेदविहितें, उचितें, स्वधर्मैं,॥
आले त्वरा करुनि सर्वहि यज्ञशाळे; । सन्मानिलें विनित होउनियां नृपाळें. ॥ १

जो जे स्थळीं योग्य अर्धा~जेथें, । शृंग क्रमें योजित तेथ तेथें. ॥
यज्ञासि जें हव्य उचीत, काळीं । देऊनि तें, पद्धति सांग पाळी. ॥ २

वेदमंत्रघोष विप्र, सुप्रसन्न होउनी, । गर्जती विशुद्धवर्ण, चित्तवृत्ति देउनी; ॥
परस्परें निजाक्षरें सुयुक्त, सुस्वरध्वनी, । अर्थयुक्त दाविता, विशेष तोषले मुनी. ॥ ३

भूपतीस थोर हर्ष दर्शनेंचि वाटला. । याग सांग देखतां विशेष तोष दाटला; ॥
कामना मनांत आजि पूर्ण लाभ लाभला, । शिष्ट इष्ट होय कीं बृहस्पती भला भला.॥ ४

' पुत्रविना परलोक नसे ', श्रुति निश्चित हेच वदे कुसरी हो. ।
अंतरसाक्ष दयानिधि केवळ, हा बिरुदें लटकीं न करीं हो. ॥
आर्त चकोर मीं, शंभु सुधाकर वारिल दुस्तर, मात खरी हो. ।
भानुकुळीं ध्वज तो अजआत्मज यापरिचा अनुताप धरी हो. ॥ ५

घृत चरु तिल पात्रीं, सांग वेदोक्त मंत्रीं, ।
करिति यजन कुंडीं विप्र, जे अग्निहोत्री; ॥

निघति अति विशाला सोज्वळा ज्वाळमाळा; ।
हरुष बहु भुपाळा लक्षितां यज्ञशाळा. ॥ ६
द्विजराज जसें शशिसूर्य तसें । तप भेदुनि जाय अकाश असें ।
जगतीं तर या सम साम्य नसे । नयनीतिलयाधिकुलोक पिसे ॥ ७
मांडलीक राय सर्व, घेउनी उपायनें, ।
येति मंडपा, सर्वे विशेष नाट्यगायनें; ॥
भेरि, काहळा, विचित्र नाद दुंदुभिस्वरीं ।
अचाट भाट वर्णिताति, गर्जती परोपरी. ॥ ८
अष्टही दिशापतींस यज्ञभाग पावला; ।
तुष्टला सुरेंद्र; चंद्रसूर्यही सुखावला; ॥
तृप्त भूमि जाहली; फणा फणेंद्र डोलवी; ।
धन्य भाग्य योग्य कीं वसिष्ठ सर्व चालवी. ॥ ९
धन्य तीं ऋषीकुळें, प्रवीण आणि निर्मळें; ।
पूर्ण ते तपोबळें, समुद्र तो जसा जळें; ॥
काळ कांपतो छळें, विरोष तेज आगळें; ।
शासनासि मानिती दिवीं, भुवीं, रसातळें. ॥ १०
यज्ञकंकण करीं नृपतीतें, । अंगनात्रय,-विनीत,-पतीतें. ॥
हव्य होमिति ऋषींसह, जाणा, । तोषला अनल तो सुरराणा. ॥ ११
बोले ऋषी राजनिधीस, जाणा, । ‘ यथार्थ पूर्णाहुति शीघ्र आणा ’. ॥
योजूनियां युक्त पदार्थजाती । राया करीं देत मुनी द्विजाती. ॥ १२
वाद्यें वाजविती गती विगतिचीं, नृत्यांगना नाचती, ।
घोषें वेद विशुद्ध तीव्र पढती, यंत्रें बळें सोडिती, ॥
यज्ञाचे निघती सुधूम्र गगनीं, ब्रह्मांड ते भेदिती, ।
गाती एक विचित्र, कीर्ति पढती, सद्रत्न वाखाणिती. ॥ १३
घेऊनि पुर्णाहुति आदरानें । समर्पिती राजनिधीकरानें, ॥
तों यज्ञनारायणमूर्ति आली, । प्रदीप्त होमांतुनियां निघाली. ॥ १४
वैश्वानराची तनु ईश्वराची, । कीं वोतिली आकृति भास्कराची; ॥
प्रसन्नवक्त्रें वर नाभिकारें । बोले, करी थाट सदन्नभारें. ॥ १५
“ दिनकरवरवंशीं मंडणा, राजवर्या, ।
सकळ विदित झाली वेदशास्त्रार्थचर्या. ॥
करुनि यजनयागां इच्छिसी ज्या अभीष्टा, ।
वरद तुज ‘ तथास्तू ’. मानिं तूं एकनिष्ठा. ॥ १६

भागत्रया करुनि पिंड तिघींस देणें; ।
होती जगत्त्रयविभूषण पुत्र तेणें; ॥
निर्दाळिती दनुज, देव सुखी कराया; ।
शीला तरे पदरजेंचि विचित्र राया; ॥ १७
शंभूसुखावह; शिळा तरती समुद्रीं; ।
नांदे सहस्र वरुषें अकरा सुभद्रीं. " ॥
देऊनियां वरद, देव अदृश्य झाला. ।
आश्चर्य वाटत असे ऋषिराजयांला. ॥ १८
वैचित्र याग परिपूर्ण, अविघ्न, ऐसा ।
योजी विभांड ऋषिराज, निरोप जैसा. ॥
रायासि बोलत, ' वधूत्रय शीघ्र आणा, ।
देऊं विभाग, मग यागसमाप्ति जाणा. ' ॥ १९
अति चतुर, गुणज्ञा, राजसा, राजभार्या; ।
उचित वचन बोले त्यां त्वरा तो अचार्या. ॥
न भरत पळ आल्या राजसा संनिधानीं; ।
जनपद निजहस्तें दूरि केलें प्रधानीं. ॥ २०
कौसल्येप्रति राजसिंह पहिला दे पिंड हस्तांतरीं. ।
सौमित्रेसि दुजा, प्रसन्न वदनें, दे आवडीनें करीं. ॥
कैकेयीसि तिजा प्रसाद दिधला. सर्वत्रही लक्षिती. ।
आली घारि, मुखीं धरूनि गगना गेली त्वरें मागुती. ॥ २१
हाणी कपाळ धरणीवरि, हांक फोडी, ।
वक्षःस्थळीं स्वकर मारुनि केश तोडी; ॥
' हा ! हा ! ' ह्मणोनि वरि नेत्र करूनि लक्षी; ।
पक्षी नसे, गगन केवळ अंतरिक्षीं. ॥ २२
बोले वसिष्ठ अति स्पष्ट विचार राया, ।
दोघीजणींस उचितार्थ असें कराया; ॥
' ( द्या ईस अर्ध अपुला ), ' मग, भाग तीतें ।
देवोनियां, बहुत तोषविलें पतीतें. ॥ २३
आनंद थोर ऋषिराय समस्त लोकां, ।
नालोकिलें, श्रवणही न कदापि, लोकां. ॥
राजा ह्मणे ' शुभ मनोरथ आजि झाले. ।
उत्तीर्ण नोहे, तुह्मि जे उपकार केले. ' ॥ २४

निघति अति विशाला सोज्वळा ज्वाळमाळा; ।
हरुष बहु भुपाळा लक्षितां यज्ञशाळा. ॥ ६
द्विजराज जसें शशिसूर्य तसें । तप भेदुनि जाय अकाश असें ।
जगतीं तर या सम साम्य नसे । नयनीतिलयाधिकुलोक पिसे ॥ ७
मांडलीक राय सर्व, घेउनी उपायनें, ।
येति मंडपा, सर्वे विशेष नाट्यगायनें; ॥
भेरि, काहळा, विचित्र नाद दुंदुभिस्वरीं ।
अचाट भाट वर्णिताति, गर्जती परोपरी. ॥ ८
अष्टही दिशापतींस यज्ञभाग पावला; ।
तुष्टला सुरेंद्र; चंद्रसूर्यही सुखावला; ॥
तृप्त भूमि जाहली; फणा फणेंद्र डोलवी; ।
धन्य भाग्य योग्य कीं वसिष्ठ सर्व चालवी. ॥ ९
धन्य तीं ऋषीकुळें, प्रवीण आणि निर्मळें; ।
पूर्ण ते तपोबळें, समुद्र तो जसा जळें; ॥
काळ कांपतो छळें, विरोष तेज आगळें; ।
शासनासि मानिती दिवीं, भुवीं, रसातळें. ॥ १०
यज्ञकंकण करीं नृपतीतें, । अंगनात्रय,–विनीत,–पतीतें. ॥
हव्य होमिति ऋषींसह, जाणा, । तोषला अनल तो सुरराणा. ॥ ११
बोले ऋषी राजनिधीस, जाणा, । ‘ यथार्थ पूर्णाहुति शीघ्र आणा ’. ॥
योजूनियां युक्त पदार्थजाती । राया करीं देत मुनी द्विजाती. ॥ १२
वाद्यें वाजविती गतीं विगतिचीं, नृत्यांगना नाचती, ।
घोषें वेद विशुद्ध तीव्र पढती, यंत्रें बळें सोडिती, ॥
यज्ञाचे निघती सुधूम्र गगनीं, ब्रह्मांड ते भेदिती, ।
गाती एक विचित्र, कीर्ति पढती, सद्रत्न वाखाणिती. ॥ १३
घेऊनि पुर्णाहुति आदरानें । समर्पिती राजनिधीकरानें, ॥
तों यज्ञनारायणमूर्ति आली, । प्रदीप्त होमांतुनियां निघाली. ॥ १४
वैश्वानराची तनु ईश्वराची, । कीं वोतिली आकृति भास्कराची; ॥
प्रसन्नवक्त्रें वर नाभिकारें । बोले, करी ताट सदन्नभारें. ॥ १५
“ दिनकरवरवंशीं मंडणा, राजवर्या, ।
सकळ विदित झाली वेदशास्त्रार्थचर्या. ॥
करुनि यजनयागां इच्छिसी ज्या अभीष्टा, ।
वरद तुज ‘ तथास्तू ’. मानिं तूं एकनिष्ठा. ॥ १६

भागत्रया करुनि पिंड तिघींस देणें; ।
होती जगत्त्रयविभूषण पुत्र तेणें; ॥
निर्दाळिती दनुज, देव सुखी कराया; ।
शीला तरे पदरजेंचि विचित्र राया; ॥ १७
शंभूसुखावह; शिळा तरती समुद्रीं; ।
नांदे सहस्त्र वरुषें अकरा सुभद्रीं. " ॥
देऊनियां वरद, देव अदृश्य झाला. ।
आश्चर्य वाटत असे ऋषिराजयांला. ॥ १८
वैचित्र याग परिपूर्ण, अविघ्न, ऐसा ।
योजीं विभांड ऋषिराज, निरोप जैसा. ॥
रायासि बोलत, ' वधूत्रय शीघ्र आणा, ।
देऊं विभाग, मग यागसमाप्ति जाणा. ' ॥ १९
अति चतुर, गुणज्ञा, राजसा, राजभार्या; ।
उचित वचन बोले त्यां त्वरा तो अचार्या. ॥
न भरत पळ आल्या राजसा संनिधानीं; ।
जनपद निजहस्तें दूरि केलें प्रधानीं. ॥ २०
कौसल्येप्रति राजसिंह पहिला दे पिंड हस्तांतरीं. ।
सौमित्रेसि दुजा, प्रसन्न वदनें, दे आवडीनें करीं. ॥
कैकेयीसि तिजा प्रसाद दिधला. सर्वत्रही लक्षिती. ।
आली घारि, मुखीं धरूनि गगना गेली त्वरें मागुती. ॥ २१
हाणी कपाळ धरणीवरि, हांक फोडी, ।
वक्षःस्थळीं स्वकर मारुनि केश तोडी; ॥
' हा ! हा ! ' ह्मणोनि वरि नेत्र करूनि लक्षी; ।
पक्षी नसे, गगन केवळ अंतरिक्षीं. ॥ २२
बोले वसिष्ठ अति स्पष्ट विचार राया, ।
दोघीजणींस उचितार्थ असें कराया; ॥
' ( द्या ईस अर्ध अपुला ), ' मग, भाग तीतें ।
देवोनियां, बहुत तोषविलें पतीतें. ॥ २३
आनंद थोर ऋषिराय समस्त लोकां, ।
नालोकिलें, श्रवणही न कदापि, लोकां. ॥
राजा ह्मणे ' शुभ मनोरथ आजि झाले. ।
उत्तीर्ण नोहे, तुह्मि जे उपकार केले. ' ॥ २४

सत्कारिले ऋषि समस्तहि आणि राजे, ।
जे आलिया यश सहस्रगुणें विराजे; ॥
ते पूजिले परम नम्र यथाक्रमें हो, ।
जे शोभती तपविशेषपराक्रमें हो. ॥ २५

वंदूनि रायासि समस्त गेले. । राजा ऋषीलागुनि वाक्य बोले, ।
' मी स्वामिंचा अंकित कीं जिवाचा, । जैसा असे दास सदाशिवाचा. ' ॥ २६
मंत्राक्षता घेउनि हस्तकीं हो । दीर्घस्वरें टाकिति मस्तकीं हो. ॥
' यज्ञासि संरक्षक पुत्र, राया, । होती; तथा विश्वहि उद्धराया. ॥ २७
क्वचित् ब्रह्मचारी न पाहेचि नारी, । गृहस्थाश्रमी एक सत्कर्मकारी, ॥
क्वचित् काननीं एक एकांतवासी, । चतुर्थाश्रमी एक राहे प्रवासी, ॥ २८
फळाहारी केव्हां क्वचित पयपानीं मति धरी, ।
क्वचित् प्रत्याहारी कचित जलपर्णाशन करी, ॥
क्वचित् ध्यानी मौनी क्वचित वितरागी जनिं वनीं, ।
समाधानी, ज्ञानी, रमति, हरि सर्वत्र नमुनी. ॥ २९
जया योग्य जें भोग्य, देऊनि हस्तें, । ऋषींचीं शतें बोळवीलीं समस्तें. ॥
नमस्कार साष्टांग घालूनि बोले, । ' मशीं धन्य केलें, ' सुखें पूर्ण डोले. ॥ ३०
बोले नृपाळ, ' गुरुराज वसिष्ठदेवा, । शृंगीऋषी सहविभांडक गौरवावा. ॥
यांच्या करें करुनि यज्ञविधान झालें; । यांचे कृपेस्तव मला यश पूर्ण आलें. ' ॥ ३१
शृंग तथा ऋषिराज विभांडक यांसि वसिष्ठ वदे मृदु, वाचे ।
' यज्ञविषीं प्रतिसूर्य तपोनिधि, केवळ कीं निजभक्त शिवाचे. ' ॥
राय यथाविधि पूजुनि बोलत ' मी शरणागत मानुनि साचे, ।
होतिल पुत्र, तदा परदर्शन; वांछित वाक्य असो अभयाचें. ' ॥ ३२
' तथास्तु ' बोलोनि निजाश्रमातें । जाती द्विजाती, हरिती श्रमातें. ॥
रायें प्रधानां सहअल्पलोकां । यथाविधी गौरविलें, विलोका. ॥ ३३
यानंतरें दोन भरोनि मासा । तो वर्तला राणिवसा तमासा ॥
नृपांगनांचीं हृदयारविंदें । विकासलीं, चित्रविचित्र छंदें. ॥ ३४
कुळगुरू वदती ' अजआत्मजा, । त्रय वधूंसि पुसा प्रिय; शीघ्र जा. ' ॥
वचन शिष्ट निरंतर बोलती । तदनुसार समस्तहि चालती. ॥ ३५
गुरुमुखें असें वाक्य आदरें । नृप शिरीं धरी, मानुनी बरें. ॥
निजमनांतरीं बहुत आवडे, । त्वरित चालिला कैकयीकडे. ॥ ३६
शोभे सगर्भ बहु कैकयि राजकांता. ।
राजा पुसे, ' प्रिय तुवें, वद; सांडि चिंता; ॥

‘ माझेंचि राज्य; इतरांसि वनासि धाडा; ।
हा आवडे बहुत, राजनिधी, पवाडा ’. ॥ ३७
वाटे वसिष्ठसह कष्टहि भूपतीला. ।
यावीण आणिक दुजें न धरी मतीला. ॥
भेदे उरीं वचन लक्षणपूर्ण भाला, ।
‘ हा ! हा ! ’ वदे ‘ कवण येउनि लाभ झाला ! ’ ॥ ३८
गेला वसिष्ठसह, जेथ असे सुमित्रा, ।
जे पीयुषापरिस गोड, शशांकवक्त्रा. ॥
धांवे धरेवरि समर्पित सर्वगात्रा ।
आलिंगिली दशरथें प्रियपद्मनेत्रा. ॥ ३९
तोषोनियां पुसत तीस, ‘ अवो सुमित्रे, ’ ।
संतुष्ट मी; तुज अभीष्ट, वदे पवित्रे. ’ ॥
हांसे, वदे ‘ वडिल सर्व हि मी तयांची ।
होईन दासि पदसेवननिश्चयाची. ॥ ४०
प्राणांपरीस मज वाटत गोड सेवा; ।
याहून आन नलगे, प्रभु, देवदेवा. ॥
वेदांतशास्त्रमुखसंमत जे प्रतिष्ठा, ।
ते पाळिजे अति सुखावह एकनिष्ठा ’. ॥ ४१
वंदूनि पाय मग मौन धरूनि राहे. ।
संतुष्टचित्त पदपंकज लक्षिताहे. ॥
ठेवोनियां अभयहस्त शिरीं, सतीतें ।
देती अशीर्वचन, इष्ट वसिष्ठ, तीतें. ॥ ४२
विचित्रें पवित्रें अशीं ब्रह्मपुत्रें । ऋषीराजेंय लक्षिलीं पद्मनेत्रें; ।
ह्मणे ‘ईश्वरी आंकळे केविं माया, । जिणें लाविलें विश्व काळक्रमा या. ’ ॥ ४३
धरुनि कर करें, हो, चालती सत्वरें, हो, ।
तंव अभिनव लीला दाविली ईश्वरें हो. ॥
नृपति दशरथाची ज्येष्ठ कांता, मृगाक्षी, ।
रघुवर उदरीं जो, तोचि बाहीर लक्षी. ॥ ४४
न साहे कौसल्ये सदन अथवा मंचक मनीं ।
सुवस्त्रापुष्पांचे निकर उपभोगासि न मनी. ॥
करी निद्रा, जेथें जनपद नसे, पादपतळीं. ।
धरी मुद्रा मौनी; हृदयकमळीं राम कवळी. ॥ ४५

नृपाळें ते काळीं अति निकट जाऊनि, नयनीं ।
विलोकी तो जाया अतिसुखभरें भूमिशयनीं. ॥
ह्मणे, ' वो कौसल्ये, प्रिय परम उद्गार मज दे '. ।
निरीक्षी भूपाळा परि वचन कांहींच न वदे. ॥ ४६

अत्यादरें धरुनि हस्तक हस्तकीं, हो, ।
लावोनियां विमल मस्तक मस्तकीं, हो, ॥
बोले, ' प्रिये, न वदसीच असोनि जागी, ।
त्यागीन मीं सकळ वैभव तूजलागीं. ' ॥ ४७

कौसल्येचा हेतु रामीं बुडाला. । ' मी ' ' माझें ' हा भाव सर्वै बुडाला.॥
अंतर्बाह्यीं दाटला रामराणा, । तर्केना जो वेदशास्त्रां पुराणां. ॥ ४८
' कैंचीं कांताकांत ? मिथ्या उपाधी । राया, वायां कां तुतें आधि बाधी॥
मारी वैरी कामलोभादि भारी । विद्वत्संगें आपुलें रूप साधी. ' ॥ ४९
कर्णीं वाणीं ऐकतां लोकपाळें, । मानी ऐसें मांडलें कां कपाळें ॥
मोठी झाली भूतबाधा प्रियेतें. । कैसा हा हो मानवी धर्म ईतें ? ॥ ५०
वदे राय, ' मी पातलों कोण कार्या ? । पुसें डोहळे प्रीय मानूनि भार्या.॥
अभिप्राय तो दूरि टाकूनि मार्गे, । वृथा कां कथा बोलसी या विरागें. ॥ ५१
तुझें लग्न तें रावणें विघ्न केलें, । असो, तेंचि भोगासि आलें भुकेलें;॥
पुढें काय होईल चर्या ? कळेना; । मतिभ्रंश मातें तुझा आकळेना. ॥ ५२
आकर्णितां रावणमात कर्णीं । यथाक्रमें राघवकीर्ति वर्णी. ॥
' आला मुनी कौशिक पुण्यखाणी, ।ज्या वानिती देव मुनी पुराणीं. ॥ ५३
द्विजा दुर्बळाच्या गृहीं दुग्ध नाहीं, । तदां आणिली धेनु मोल्येंचि, पाहीं.॥
अकस्मात ते कामधेनूच झाली, । गृहा क्षीरसिंधूच घेवोनि आली. ॥ ५४
प्रसंगें तसा विप्र कौशीक आला. । करूं दास्यभावा अती शीघ्र चाला. ॥
पुढें भासती कार्यसंभार नाना, । ऋषी वाल्मिकें गाइला जो तनाना. ॥ ५५

धांवा सवेग, शरकार्मुक शीघ्र आणा. ।
संतोषवूं ऋषिगणां सकळांसि, जाणा. ॥
सत्कीर्ति शौर्य निजभूषण राजयाचें. ।
यावीण तें धिक जिणें सहसा तयाचें. ॥ ५६

स्पर्शे सुरेंद्र कपटें वधु गौतमाची. ।
झाली शिळा जडतनू निबिडा तमाची. ॥
ते उद्धरूं पदरजें, स्वपदासि जाया. ।
होईल योग्य ऋषिराजपदें भजाया. ॥ ५७

अमित्रांचा बंधू, शरण इतरां एकचि गती, ।
करूं राजा लंके विभिषण. वदों आणिक किती. ॥
सखा तो प्राणाचा, अनुज, विजयी, साह्य मजला. ।
किती कैसें कोणी कपिकटक नाहीं समजला. ॥ ५८
स्थापूं सुरां निजपदीं; असुरांसि दंडूं; ।
पाषांड, बंड, अतिलंड, कुमत्त, खंडूं; ॥
सत्कर्म, धर्म, हरिभक्ति, विरक्ति, जोडूं; ।
संमोहशोकअविवेकसमूह तोडूं. ॥ ५९
सत्यासि छत्र धरवूं; दुरितासि जाळूं; ।
गोब्राह्मणां, विनत होउनि पूर्ण, पाळूं; ॥
दीनें, अनाथ, गतिहीन, तयां कृपाळू ।
देऊनि अन्नधन, कांचन, आर्ति टाळूं. ॥ ६०
पीडा प्रजांसि न करूं; परबाध वारूं; ।
वेदानुवादविधिदूषक यांसि मारूं; ॥
माता, पिता, सुजन, भाविक भक्त, निंदी, ।
घालूं तया यमपुरीस अघोर बंदी. ' ॥ ६१
राजा वदे, ' बरळते वधु; ईस फांटा; ।
आली असेल विवसीच, अघात मोठा. ॥
आतां उपाय मज काय ? ' पुसे वसिष्ठा. ।
त्या लागली परम पावन पूर्णकाष्ठा ॥ ६२
आहा ! कसें ! गजबजोनि पिटी कपाळा. ।
आरंभलें परम संकट, लोकपाळा. ।
नानाश्रमेंकरुनि मागितलें अपत्या, ॥
तों जोडिली वधुसहीत अचार्यहत्या. ॥ ६३
राजा स्वयेंचि मतिहीन अशक्त झाला, ।
पाळी तदा कवण येउनियां प्रजांला ? ॥
तैसा वसिष्ठ कुलपालक साह्यकारी ।
झाला भ्रमीत, मग संकट कोण वारी ? ॥ ६४
आक्रंदतां नृप, गुरू, उघडोनि डोळे, ।
डोले सुखें, ' सुदिन आजि विशेष ' बोले. ॥
' राया, तुझें परम भाग्य अतर्क्य, पाहीं. ।
ब्रह्मादिदेवनिगमांप्रति गम्य नाहीं. ॥ ६५

साक्षात् परब्रह्म मुसावलें कीं, । पतिव्रतेलागिं ठसावलें कीं, ॥
समाधि शेजेसि विराजताहे, । लोकत्रयीं दुंदुभि वाजताहे. ' ॥ ६६
राय बोलत ' गुरो, मम जाया । भासते त्वरित देह त्यजाया. ॥
सन्निपात जडला दृढ, जाणा; । दक्ष कौशिक ऋषीप्रति आणा. ॥ ६७
मातापितातनुजआदिकरूनि घाता ।
केलें वनीं. स्मरत चित्त तया अघाता. ॥
स्वामींसही निरखितांचि तटस्थ मुद्रा. ।
जालों बहूत भयभीत, दयासमुद्रा. ' ॥ ६८
प्रत्यक्ष सूर्य गुरुवर्य वसिष्ठदेवें ।
संबोधिलें दशरथाप्रति, हो सदैवें. ॥
' हो सावधान, रविवंशजमंडणा, रे, ।
झाली तुझी त्वरित पंक्ति विखंडणा, रे. ॥ ६९
जाया तुझी परम पावन शुक्ति. साचें ।
श्रीराम मुक्त, अति उत्तम, चिद्रसाचें. ॥
यज्ञेश्वरासहित सर्व ऋषेश्वरांचा ।
झाला प्रसाद तुज केवळ ईश्वराचा. ॥ ७०
येथें नसेचि विवशी आणि भूत, राया, ।
भूभार वारुनि जगत्त्रय उद्धराया, ॥
नामेंकरूनि भवसिंधु जनां तराया, ।
आला परेश; तव संकट निस्तराया. ॥ ७१
ब्रह्मांडांच्या लक्षकोट्यानुकोटी ।
होती, जाती, नांदती सर्व पोटीं. ॥
होणें, जाणें, सर्वथा यासि नाहीं. ।
लीलारूपें खेळ खेळे विदेही. ' ॥ ७२
विकासूनि नेत्रांबुजें राजदारा । ह्मणे, ' लक्ष्मणा, क्षात्रधर्में, उदारा, ॥
वधी इंद्रजीता; महत्कार्य साधीं; । वियोगें सितेच्या मतें आधि बाधी. ॥ ७३
अरे अंजनीनंदना, येचि काळीं । पुरी राक्षसाची अती शीघ्र जाळीं; ॥
तनू अक्षयाची दुजा जंबुमाळी । विदारीं, करीं वैरियासी धुमाळी. ' ॥ ७४
दावूनियां चित्रविचित्र चर्या, । झाली तदां सावध राजभार्या. ॥
पाहे अचार्यां आणि राजवर्या, । तैं सांवरी देह अवेव (?) कार्या. ॥ ७५
वंदी गुरूचीं चरणारविंदें । अनुक्रमें राजपदें आनंदें. ॥
' अद्भूत कीं वोढवलें, कपाळा ! । माझ्यामुळें क्लेश बहू नृपाळा. ' ॥ ७६

कुर्वाळिला मस्तक श्रीवसिष्ठें ।
वाक्यें जशीं पीयुषतुल्य इष्टें ॥
तपें तुझीं पावन पुण्यराशी ।
आला कृपे राघव गर्भवाशीं ॥ ७७

राजा स्वयें गद्गद कंठ बोले ।
'प्रिये तुतें क्लेश विशेष झाले.' ॥
'त्यजूनियां राज्य वनासि जावें ।
वाटे मना देह परित्यजावें' ॥ ७८

कौसल्येची मानुनीयां प्रतिज्ञा ।
आचार्या तो देत रायासि आज्ञा ॥
जावें आतां मंदिरा स्वस्थ चित्तें ।
न्यावी जाया सारसाक्षी स्वहस्तें ॥ ७९

दशरथ सहकांता मंचकारूढ होतां ।
नयनयुगुल झांकी लागलें ध्यान चित्ता ॥
वदत गुरुवरातें 'पातली पूर्वचर्या ।
विगति गति इयेची मी धरूं केविं धैर्या' ॥ ८०

सुप्रसन्न वचनें गुरु बोले ।
धन्य भाग्य अमुचें ह्मणे झालें ॥
पूर्णमास भरती नव जेव्हां ।
राजया परम उत्सह तेव्हां ॥ ८१

जों दशा न उमटे दशमाची ।
तोंचि तो अजि कथा विषमाची ॥
धैर्य स्थैर्य निजशौर्य धरावें ।
बोलिलें विहित तेंचि करावें ॥ ८२

ओसरे नवम तो नभपोटीं ।
वाजती सघन दुंदुभि कोटी ॥
पातले सुरसमूह विशेषें ।
गर्जती सकल मंगळ घोषें ॥ ८३

बोलती विजय आजि सुरांचा ।
नाश येथुनि गमे असुरांचा ॥
नारदादि मुनिवृंद आनंदें ।
दाविती परम कौतुक छंदें ॥ ८४

आयुधें सह चतुर्भुज वेषें ।
मंदिरीं प्रकट होय विशेषें ॥
तेज सोज्वळ दिनेश जसा हो ।
भासला प्रभु सतीस तसा हो ॥ ८५

घालूनि साष्टांग पदारविंदें ।
वंदोनिया —◡ करी अनंदें ॥
मी दीन हीनाहुनि हीन जाया ।
नाहीं यथायोग्य तपासि जाया ॥ ८६

पुनःपुन्हा दंडवतेंचि घाली ।
विद्युल्लता जेविं नभीं निघाली ॥
टाकोनियां लौकिक लाज मार्गे ।
वंदी पदाब्जाप्रति सानुरागें ॥ ८७

जाणोनियां उत्तम भाव तीतें ।
" प्रसन्न मी तूज " वदे सतीतें ॥
शिशुत्व मांडीवरि अंगिकारी ।
निस्संग जो निर्गुण निर्विकारी ॥ ८८

प्रसूतिचा भाव नसेचि झाला ।
होईल तो जन्म कसा अजाला ॥
लोकीं निकी बाळदशाच दावी ।
लीला तयाची कवणें वदावी ॥ ८९

सौमित्रही याचपरी अयोनी ।
शेष स्वयें रूप धरी न योनी ।
तेजागळा चंद्र गमे अकाशीं ।
शोभे तसा बाळक सावकाशीं ॥ ९०

प्रसूत कैकयी तदा न येचि वेणही कदा ।
सुपुत्र शंख चक्र ते, गणील कोण संपदा ! ॥
कळेचिही महत्कळा, श्रुतीसि नेणवे लिला, ।
धराधरा विधीवरा अलक्ष्य यांचिया बला, ॥ ९१

सुविप्र सर्व देशिंचे सवेग तेथ पातले, ।
सुकीर्ति ऐकतां मनीं अनंदरूप मातले, ॥
सुयुक्त ज्योतिषी तथा मिमांसकारि धांवले ।
विशुद्धसत्व सद्विवेकवंतही सुखावले ॥ ९२

ब्रह्मचर्य, वानप्रस्थ, मस्करी तथा गृहस्थ ।
तापसी, जटाखुयुक्त त्यक्त दूरि कामना ॥
मानुनीं विशेष पर्व टाकिती पदार्थ सर्व ।
पाहती अपूर्व राजपुत्रवर्य आनना ॥ ९३
विधानें विधीयुक्त याज्ञीक पाहो ।
क्रिया दाविती, फोडिती मंत्रटाहो ॥
भरे अंबरीं नाद दीर्घ स्वराचा ।
रुपा राम आला सखा ईश्वराचा ॥ ९४
सप्तस्वरें किन्नर गीत गाती ।
गंधर्व विद्याधर तान घेती ।
दिक्पाळ इंद्रादिक सर्व जाती ।
विलोकितां हालविती न पातीं ॥ ९५.
भेरी मृदंग वरि झल्लरि नाद गाजे ।
घंटानिनाद अति मंजुळ वेणु वाजे ॥
पात्रानुसार सकळांसि यथापरत्वें ।
घेऊनि लक्ष धन बोळविती महत्त्वें ॥ ९६
गोदान भूमिजलवस्त्रसदन्नदानें ।
संतोषवूनि सकलांसि विधीविधानें ॥
लक्षानुलक्ष फळपत्ररसप्रदानें ।
संस्थापिलीं निजसुतां विविधाभिधानें ॥ ९७
कौसल्यात्मज राम लक्ष्मण दुजा सौमित्रिचा जन्मला ।
कैकेयीस पवित्र दोन दोन; भरत, शत्रुघ्न तो धाकुला ॥
विश्वामित्र वसिष्ठ कश्यप ऋषी भृग्वाद सर्वै मुखें ।
नामें देउनि ठेवुनी कर शिरीं गेले स्वधामा सुखें ॥ ९८
ज्योतिषी बहुत शोधुनि जातकें ।
निर्मिलीं सकलविघ्ननिपातकें ॥
कीर्तनें दहन सर्वहि पातकें ।
जन्ममृत्युपतनासि घातकें ॥ ९९
वृंदारकीं, सिद्धगणीं, मुनेश्वरीं ।
गंधर्वविद्याधरयक्षकिन्नरीं ॥
दिक्पाळ भूपालक सर्वही करीं ।
पुष्पांजली वाहति बाळका शिरीं ॥ १००

दिसति बाळकें विश्वपाळकें ।
भुवन-मंडणें सर्व चाळकें ॥
दनुजकुंजरा वीर केसरी ।
कवण पावती यांचिये सरी ॥ १०१

बालार्कतेजें सम दिव्य दीप्ती ।
पहावया चंद्र सुरेंद्र येती. ॥
लोकत्रयें थोर अनंद केला ।
जो तो वदे आजि सुदीन जाला ॥ १०२
अयोध्यापुरी राम हा जन्मला हो ॥
अह्मी घेउं या भक्तिचा पूर्ण लाहो ॥
असें बोलती भक्तवृंदें समस्तें ।
करूं पूजनें सर्वदा स्व-स्वहस्तें ॥ १०३
सुरगण दशवक्त्रें घातलें बंदिशाळें ।
ह्मणवुनि रविवंशीं जन्मला हा स्वलीळे ॥
पुनित जन कराया भूतला मूर्ति आली ॥
परि गुणमयि माया मोहनी भ्रांति घाली ॥ १०४
श्रीराम लक्ष्मण । भरत आणि शत्रुघ्न ।
चौघे बंधू समसमान । दिवसेंदिवस वाढले ।
दैत्या दानवांशीं काळ । वाटे कौसल्येसी बाळ ।
भक्तजनां प्रतिपाळ । ऐसे लोकीं रूढले ॥
मुनिजनांचें ध्येयध्यान । पूर्ण ब्रह्म सनातन ।
भानुवंशीं हा चिद्भान । साधुसंतां वाटले ॥
जो निर्गुण निःसंग । निजानंद जो अभंग ।
सर्वांरंगीं एकरंग । हे बोल खुंटले ॥ १०५

# गजेंद्रमोक्ष.

( सवाई. )

श्रीनिजमूर्ति तुझें पदसेवन जीवन देउनि नीववि काया, ।
जें भवतारक, तापनिवारक, लावि गिरा तव नाम वदाया. ॥
मानस मीपण टाकुनि निश्चळ सत्स्वरुपीं रत छेदुनि माया ।
रंग अभंग करी; नलगे मज इंद्रपदादिकही गुरुराया. ॥ १

पार अपार हरादिक नेणति, तो गुरुराज सखा मजला, ।
बोलियला मुनिमानसमोहन ' मागसि तें दिधलें तुजला ॥
बोल सुखावह, डोलति सज्जन सांग, गजेंद्र कसा तरला ? ' ।
तो वर लाहुनियां शिरसा, मग रंग सुखानुभवीं भरला. ॥ २

एक मनोरम तो गिरि उत्तम, ज्या त्रिकुटाचल नाम विराजे; ।
दीर्घ शतें शतयोजनमंडित, त्या तुळणे सम मेरुचि साजे. ॥
वृक्ष लता बहुतापरि डोलति कोकिळशूकमुखारव वाजे, ।
खेळति पक्षिकुळें विविधाकृति, शार्दुल गर्जति, अंबर गाजे. ॥ ३

किन्नरगायन नाद सुधारस ऐकति सिद्ध मुनींद्र सुखें, ।
योगलिळेप्रति साधक साधिति, तें सुख वानिल कोण मुखें ? ॥
एक निवृत्त परावरशोधक डोलति ऐक्यपणें हरिखें, ।
त्या अनुपम्य पदाप्रति दाविल श्रीगुरुवांचुनि कोण सखे ? ॥ ४

अमृततुल्य सरोवरिचें निर सेवुनियां क्रिडती वनगाई, ।
हेममयीं कमळीं रत षट्पद, मज्जन पान अती सुखदाई. ॥
पादप पुष्पफळांकित उत्तम, तेथिल वानिल कोण नवाई ? ।
मानुनियां सुखभोज विराजतसे गजराज मदोन्मत ठाईं. ॥ ५

भीमपराक्रम काळ तुळे सम, दिग्गज नामभयें दुरि जाती, ।
निर्जरनायकवाहनही भयभीत धरातळिंचे गज कीती ! ॥
मेघमुखाहुनि घोष विशेष, भयें क्षिति लक्षिति श्वापदयाती. ।
कोण गणी अगणीत बळा ? गज राज्य करी समवेत स्वजाती. ॥ ६

यापरि हिंडतसे, वन धुंडित, सेवित कोमल पल्लवचारा, ! ।
कामसुखें विचरे विधि टाकुनि बोधित कोण तया अविचारा ! ॥

क्रोध कदां न शमे, अघदायक मोह सदां स्रवती मदधारा, ।
मत्सर दंभ निरंतर, गर्व अनावर, सर्व अनर्थ पसारा. ॥ ७
एक दिनीं फळ पल्लव सेवुनि, व्याकुळ प्राण तृषा सकळांसी ।
उत्तम तीर निरीक्षुनियां निर देउनि तृप्त करी सहवासी ॥
तोय मुखीं जंव घालितसे तंव, बोढवलें बहु अद्भुत त्यासी ।
नक्र जळीं पद वोढित जेविं दिवाकरबिंब बळें ग्रह ग्रासी ॥ ८
रोवुनि दंत मदीं, पद ओढितसे, गज ताढित त्यासि बळें, ।
थाप जळावरि मारितसे, परि नक्रपराक्रम तो न ढळे. ॥
गोंवियला गजराज निरीक्षुनियां, परिवार समूळ पळे ।
युद्धवशें तनु जर्जर होऊनि व्याकुळ तो गज, शक्ति गळे ॥ ९
चिंतितसे गज ' संकट हें मज बंधु, सुता, सुत, निष्ठुर पाहा ।
प्रीय कलत्र, सगोत्रज, मित्र, तयांप्रति तो उचितार्थ नव्हे हा ॥
वैभव तों सुखसंभ्रम दाविति, कृत्रिम लाघव लाविति मोहा; ।
व्यर्थ अनर्थकरें प्रतिपाळुनि, शेवट येकट येकट आहा ! ॥ १०
कामविलास सुखावह मानुनि, अर्चितसे मजलागुनि जाया; ।
बंधु वदे ' धनसंग्रह दे मज याविण तो स्नेह दाविसि वाया ' ॥
पुत्र सभाग्यपणीं अनुकूल उपेक्षिति जे दिनिं जर्जर काया ।
पामर मी भुललों मृगतृष्णिक भूलविलों ममता मोह माया, ॥ ११
खेद करी अनुताप धरी अवलोकित काय उपाय करावा ।
आठवला सुखदायक मंत्र, दयानिधि तो जगदीश वरावा. ॥
वारिल संकट तो सुखसागर, भावबळें भवसिंधु तरावा; ।
याविण आणिक मित्र नसे, कळलें गुज हा मज लोक परावा. ॥ १२
अंबुज एक करी अवलंबुनि भक्तिपुरस्सर डोलतसे, ।
हृत्कमळीं कमळापति चिंतुनि मंद गिरा मग बोलतसे ॥
' हृद्गत तूं निजमूर्ति सखा तुजवीण दुजें मज कोण असे ? ।
पाव अपाय निवारुनि मी मज दावुनि वारि समूळ पिसें ॥ १३
तूं अज, अव्यय, नित्य, निरामय, तूं सच्चिन्मय, सौख्यनिधाना ! ।
हा जगडंबर भासत तद्वत वोघतरंग जळावरी नाना ॥
कुंडल किंकिणि नूपुर कंकण कांचन एक बहू अभिधाना, ।
वेद वदे जगदंतर एक निरंतर, नातळसी भवभाना ॥ १४
विश्वरुपा ! अरुपा ! अविकार ! अनाम ! असंग ! अनंत ! अपारा ! ।
शास्त्र पुराण विवाद सदां करिती, परि निश्चिति नेणति पारा. ॥

विश्व तुझ्या स्वरुपीं परिकल्पित विद्धत वानिति विश्वअधारा ।
' नेति ' वदोन सरे श्रुतिवादन वाच्य अवाच्य वृथा श्रम सारा ॥ १५
साच नसे मृगतोय सुनिश्चित आश्रय भानु तयाप्रति पाहें ।
लोह चळे परि चुंबक अक्रिय निष्क्रिय तेवि विलासत आहे ॥
दृश्य नसे घन चिद्रुप तद्रुप तंतु पटत्वरुपें दिसताहे ।
हें निज गुह्य अलौकिक जाणति, संत अनंत सुखें रमताहे ॥ १६
निर्गुण जें रुप यापरिचें विणभेद सगूणहि त्या वदती ।
तें सुखदायक मानुनि एक विराग धरूनि मनें भजती ॥
भक्तिसुखें तुज अर्चिति उत्तम ते पर मी तर हीन किती ? ।
त्या करुणाकर श्रीचरणांप्रति मी शरणागत आर्तमती. ॥ १७
उद्धरिला अजमीळ अहंकृति, तारियली गणिका अघराशी, ।
हिंसक व्याध अगाध जिवांप्रति विंधुनियां शर भक्षिति त्यांसी ॥
चोज कसें ? गुज सांग तयाहुनि पातक काय असे मजपाशीं ? ।
दीनदयाकर हे बिरुदावळि वानिति वेद निरंतर कैसी ? ॥ १८
पीडितसे ग्रह वारुनि यासि अनुग्रह दे मज पूर्ण सुखा. ।
कीर्ति करी, निज भूषण तारुनि, दुष्कृतराशि पशू विमुखा. ॥
मी तृणभक्षक मंदमती, महिमान अगोचर शेषमुखा ।
जाणसि अंतरिचें अति संकट आन नसे तुजवीण सखा. ' ॥ १९
अंतरिंचा अनुपात विलोकुनि तो करुणाघन येऊनि नेटें ।
नक्र जळीं जंव वोढितसे तंव हाणितला निजचक्रचपेटें ॥
फोडुनियां मुख काढित बाहिर नक्रगजां अति अद्भुत मोठें ।
पद्मकरें अभयंकर देउनि सोडविलीं पशुदेह सुनाटें ॥ २०
अमृतहस्तक ठेवुनियां कुरवाळित मस्तक तो सुखदानी ।
वाजति मंगळ घोष सुकीर्ति सुभाषित बोलति देव विमानीं ॥
भक्तिसुखाहुनि थोर नसे सुखकारक वेद वदे गुज कानीं ।
मायिक तीं लटकीं अघदायक जानकिनायक एक निदानीं ॥ २१
भक्तिसुखें प्रल्हाद तरे, मुनि नारद भक्तिसुखें विचरे, ।
भक्तिसुखें सनकादिक पावन, भक्तिसुखें उपमन्यु सरे, ॥
भक्तिसुखें ध्रुवबाळ सुखावह, व्यासमुखें जगताप हरे, ।
वाल्मिकि, अंबऋषी, बाळि, भीष्म, शुकादिक तन्मय भक्तिभरें ॥ २२
उद्धव, अर्जुन, धर्म, बिभीषण रामपदीं रत चित्त जयाचें, ।
अक्रुर वैष्णव, भक्त कपी हनुमंत, सभाग्य जिणें विदुराचें, ॥

भानुकुळीं रुखुमांगद भक्त, सुधाकरवंशि परीक्षिति साचे ।
ऐक्य निरंतर चित्स्वरुपीं निजभक्त वदे श्रुति नाम तयाचें. ॥ २३
भक्तिसुपानसुखीं मन होऊनि उन्मन भेदअभेदविना ते ।
भोगिति भोग अतींद्रिय देखति एकपणेंचि जनां विजनातें ॥
सारुनि मीपण भाविति आपण अक्रिय निश्चित ज्ञानघनातें ।
रंगविना निज वस्तु सदोदित प्रत्यय निश्चय साधुजनातें. ॥ २४



# चांगदेवचरित्र.

स्वामीचिये आज्ञे उभयतां शिष्य । वेगीं प्रयाणासि करिते जाले. ॥ १ ॥
नित्य मुखीं स्मरती चांगयाचें नाम, । जेणें सकल काम पूर्ण होती. ॥ २ ॥
आसनीं, शयनीं, सर्वकाळ ध्यानीं, । सदा वसे मनीं चांगदेव. ॥ ३ ॥
चांगदेवें कांहीं कळा ऐशी केली: । घटिका एक जाली प्रयाणासि, ॥ ४ ॥
उभयतां ब्राह्मण पाहती कौतुक; । दृष्टीपुढें एक ग्राम दिसे. ॥ ५ ॥
ग्रामस्थ लोकांसि पुसती ब्राह्मण. । ‘ ग्रामाचें या नाम काय असे ? ॥ ६ ॥
‘ ग्रामाचें या नाम ’ ह्मणती, आळंदी; । वाहतसे नदी, इंद्रायणी. ’ ॥ ७ ॥
‘ येथूनियां किती तथीचांगदेव ? ’ । उभयतां भूदेव पुसताती. ॥ ८ ॥
‘ क्रोशशत आणि पन्नास वरुते, । ऐशी संख्या असे येथूनियां. ’ ॥ ९ ॥
उभयतां शिष्य आश्चर्य करिती; । म्हणती ‘ अद्‌भुत देखियेलें; ॥ १० ॥
दीड शत क्रोश घटिकेंत क्रमून । चांगदेवींहून आलों आम्ही. ’ ॥ ११ ॥
लोक म्हणती, ‘ त्याची सिद्धाई उत्कृष्ट; । त्यापाशीं हे स्पष्ट कळा आहे. ’ ॥ १२ ॥
ग्रामांत प्रवेश उभयतां करिती, । एक वेदमूर्ति भेटलासे; ॥ १३ ॥
तया ब्राह्मणास वृत्तांत पुसती, । ‘ ज्ञाने-श्वर, निवृत्ति राहती कोठें ? ’ ॥ १४ ॥
सर्व वर्तमान विप्रें सांगितलें, । दुरून दाखविलें स्थळालागीं. ॥ १५ ॥
देखतांचि स्थळ सन्मुख चालिलें; । दृष्टीस देखिले ज्ञानेश्वर. ॥ १६ ॥
दुरूनि ज्ञानेश्वरें उभयतां देखिलें; । हांसोनि बोलिले निवृत्तीसि. ॥ १७ ॥
‘ अवतार आपण धरिला ज्याकारणें । तयाचें दर्शन होईल आतां. ॥ १८ ॥
चांगा वटेश्वर सिद्ध योगाभ्यासी, । पत्र आपणांसि पाठविलें. ॥ १९ ॥
सन्मुख येतसे शिष्य चांगयाचा । बंद कागदाचा कोरा असे. ’ ॥ २० ॥
ऐसें बोलतांचि जवळी ते आले. । साष्टांग नमिले ज्ञानेश्वरीं. ॥ २१ ॥
म्हणती ज्ञानेश्वर, ‘ आले तपीहूनि । कोरें पत्र घेऊनि चांगयाचें. ’ ॥ २२ ॥
शिष्यीं ऐकूनियां आश्चर्यातें केलें; । ‘ यथार्थ बोलिले स्वामी तुम्ही ॥ २३ ॥
आम्ही न बोलतां ज्ञानीं तुम्हां कळे ! । परब्रह्म पुतळे दिसततसां. ’ ॥ २४ ॥
सर्व वर्तमान सिद्धाचें सांगती; । कागद ठेविती कोरा पुढें. ॥ २५ ॥
पत्र उकलूनि पाहती ज्ञानदेव; । मागें पुढें सर्व कोरें असे. ॥ २६ ॥
निवृत्ति, ज्ञानेश्वर करिती विचार; । ‘ कागद हा कोरा पाठविला. । २७ ॥

कोरा कागदाचें कवण कारण ? । मनीं विचारूनि पहा तुम्ही.' ॥ २८ ॥
बोलती निवृत्ति, ज्ञानेश्वरा, ऐक. । सिद्ध महाराज चांगदेव. ॥ २९ ॥
ऋद्धि सिद्धि सर्वविद्या ते साधिले । ब्रह्मादिकां न कळे पार ज्याचा. ॥ ३० ॥
आत्मा ने ब्रह्मांडीं काळातें वंचूनि. । वर्तमान ज्ञानीं सर्व कळे ॥ ३१ ॥
चवदा शत वरुषें नरदेह रक्षिला. । बहुत श्रमाला केलें असे. ॥ ३२ ॥
आंगीं थोर असे सिद्धाईचा ताठा; । अहंकारी मोठा भूमंडळीं. ॥ ३३ ॥
ब्रह्मज्ञानकळा स्वप्नींही न कळे, । ये विषयीं आंधळे नेत्र त्याचे. ॥ ३४ ॥
तुमची सिद्धाई ऐकूनि उत्कृष्ट । लागली चटपट थोर जीवा. ॥ ३५ ॥
श्रेष्ठत्व कनिष्ठत्व उभयतां भाव; । कोण गौरव पत्र लेखा ?' ॥ ३६ ॥
ऐसा हा संदेह मनांत धरूनि, । पाठवी तेथूनि कोरें पत्र. ॥ ३७ ॥
सर्व विद्या जागे सर्वेही कलांसि; । ब्रह्मज्ञानाविषीं कोरा असे. ॥ ३८ ॥
म्हणऊनि कोरें पत्रपाठविलें तुम्हां । त्याचा भाव आम्हां हाचि दिसे। ३९ ॥
तुम्ही आतां ऐसें पत्र करा सिद्ध, । पाहतांचि बोध होय त्यासि. ॥ ४० ॥
ज्ञानेश्वरें केलें निवृत्ती नमन; । मग पत्रलेखन करिते जाले. ॥ ४१ ॥
'स्वस्ति श्री वटेश्वर चांगया, अवधरीं. । ब्रह्म चराचरीं एक असे. ॥ ४२ ॥
द्वैताचें नाम स्वप्नींही न दिसे, । ऐशा निश्चयासि धरीं आतां. ॥ ४३ ॥
देह कवणाचा ? कवण नांदे देहीं ? । आपणातें पाहीं विचारूनि ॥ ४४ ॥
योग तो कठिण, साधितां साधन । तें योगाचें धन न पविजे. ॥ ४५ ॥
मन जेथें जेथें धांवूनियां जाय, । तेथें तेथें पाहे आपण या. ॥ ४६ ॥
लिखितपासष्ट पत्राक्षरीं वाचावें, । अर्थासि बरवें विचारूनि. ॥ ४७ ॥
सूक्ष्म दृष्टीनें याचा करावा विचार; । वेदशास्त्रीं सार हेंचि असे.' ॥ ४८ ॥
पत्राचें लेखन करूनि ज्ञानेश्वरीं । शिष्याचे हें करीं दीधलेंसे. ॥ ४९ ॥
'चांगयासि सांगा अमुचें नमन. । 'सूक्ष्म दृष्टीनें पत्र वाचा. ॥ ५० ॥
चवदाशें वर्षांचें सार्थक करावें; । अनुभवें घ्यावें स्वात्मसुख.' ॥ ५१ ॥
पत्र घेऊनियां ज्ञानदेव नमिले. । शिष्य स्वार झाले चांगयाचे. ॥ ५२ ॥
साष्टांग नमन स्वामींसि करिती । पत्रासिही देती त्यांच्या करीं. ॥ ५३ ॥
नमस्कार ज्ञानेश्वराचा सांगती. । म्हणती " विज्ञप्ति बहुत केली. ॥५४ ॥
' बहुत दिवस देह हा दंडिला; । चवदाशें वरुषांला क्रमीयेलें. ॥ ५५ ॥
आतां बरव्या रीती सार्थक करावें; । पत्रासि पाहावें सूक्ष्म दृष्टी. " ॥ ५६ ॥
योगाभ्यास त्यांचा; पाहिली सिद्धाई; । दांभिक हें नाहीं तयांपाशीं. ॥ ५७ ॥

चार्‍ही मुलें असती वयें कच्चानियां सानीं । अद्भूत करणी दिसे त्यांची. ॥५८॥
मूर्तिमंत देव तिन्ही दिसतातीं. । चवथी, तें शक्ति अवतरली. ॥ ५९ ॥
देखियेलें, थोर आह्मी चमत्कारा । कळेल तें करा याउपरी. " ॥ ६० ॥
ऐसें वर्तमान मुखें सांगताती, । पत्र हातीं देती चांगयाचें. ॥ ६१ ॥
उकलूनि पत्र पाहती योगेश्वर. । अक्षर सुंदर बहुत असे. ॥ ६२ ॥
अक्षरेंअक्षर पाहती पृथकाकार. । अर्थाचा विचार बहुत केला. ॥ ६३ ॥
पहिलीच वोवी वाचूनि पाहिली; । कल्पना योजिली नाना अर्थी. ॥ ६४ ॥
बहूतां प्रकारें शोधूनियां अर्थ । पाहतां, यथार्थ न कळेचि. ॥ ६५ ॥
चित्तांत बहुत वाटलें विषम. । म्हणती, ' हें वर्म नकळेंचि. ॥६६ ॥
चवदा विद्या आणि कळा चौसष्टी।परम संकष्टीं साधियेल्या; ॥ ६७ ॥
परंतु हे कळा न कळे कांहीं केल्या । बहुत पाहिल्या वेदविद्या. ॥ ६८ ॥
तयाचे भेटीसि जावें येथूनियां; । पत्र शोधूनियां विचारावें. ॥ ६९ ॥
आपुली सिद्धाई दाखवूं तयासि । अघटित करणीसि करूं आतां. ' ॥ ७० ॥
ऐसा हा निश्चय केलासे मनाचा. । समुदाय शिष्यांचा पाचारिला. ॥ ७१ ॥
म्हणती, ' चला जाऊं भेटी ज्ञानेश्वरा. । कांहीं चमत्कारा दावूं त्यासि. ' ॥७२॥
मोहन, स्तंभन आणि वशीकरण, । विद्यांचें संपूर्ण स्मरण केलें. ॥ ७३ ॥
व्याघ्रावरि आरूढ शिष्यसमुदाव; । मध्यें चांगदेव शोभतातीं. ॥ ७४ ॥
व्याघ्राचें वाहन, सर्पाचे चाबुक, । थोर कौतुक जगीं जालें. ॥ ७५ ॥
चमत्कार थोर देखिला सिद्धाईचा; । लोक काया वाचा शरण येती. ॥ ७६ ॥
ततीचांगदेवीहूनि चालियेले । प्रयाणासि केलें दक्षिणेसि. ॥ ७७ ॥
व्याघ्र वाहना, सर्पाचा चाबुका, । कळावया लोकां सकळांसि; ॥ ७८ ॥
म्हणोनियां मार्गी चालताती स्थिर. । आले भीमातीर जेथें असे. ॥ ७९ ॥
अश्वत्थ नामक ग्राम भीमा नदी; । तेथूनि आळंदी कोस चारी. ॥ ८० ॥
स्नानसंध्या भीमातीरीं करावयासि । राहिले अनायासीं घटी चार. ॥ ८१ ॥
व्याघ्रारूढ शिष्य पुढें एक जात । वर्तमान श्रुत करावया ॥ ८२ ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर बैसले सोपान. । आत्मज्ञानीं खूण बोलताती. ॥ ८३ ॥
तंव पुढें एक कौतुक देखती. । ' व्याघ्रारूढ, ' म्हणती, 'आला विप्र. ॥८४॥
तर्के शिष्य चांगयाचा दिसतसे. । पत्राच्या अर्थासि कळलें नाहीं. ' ॥ ८५ ॥
ऐसें बोलतांचि व्याघ्र सन्निध आला; । खालीं उतरला ब्राह्मण तो; ॥ ८६ ॥
साष्टांग नमन केलें चांगदेवा, । तेहीं सर्व भावा जाणितलें; ॥ ८७ ॥

म्हणती, ' चांगदेव व्याघ्रारूढ आले ! । कासया श्रमले येथवरि ? ॥ ८८ ॥
पत्र वाचूनियां काय न पाहती ? । काय अर्थ चित्तीं आला नाहीं ? ॥ ८९ ॥
पत्राचाही अर्थ विचारूनि घ्यावा । ह्मणऊनि यात्रा केला तेहीं ? ' ॥ ९० ॥
निवृत्ति म्हणती, ' चवदाशें वरुषांचे । मरुद्गण स्वर्गीचे आले येथें ॥ ९१ ॥
बहुत करावा तयांचा आदर; । येथूनि सामोरां पुढें जावें. ॥ ९२ ॥
दगडाचे भिंतीवरि ते बैसले, । सत्वर चालिले भिंतीसहित. ॥ ९३ ॥
पाषाणाची भिंती चाले दडदडां, । जैसा चाले घोडा तुरकी तो. ॥ ९४ ॥
ग्रामापासूनि कोस एक आले. । दृष्टीस देखिले चांगदेव. ॥ ९५ ॥
दगडाची भिंती चालतां देखिली, । ग्रंथिही सुटली अभिमानाची. ॥ ९६ ॥
व्याघ्राखालीं उडी सत्वर घातली. । दंडवत केला चवघां जणां. ॥ ९७ ॥
देखूनि निवृत्ति, ज्ञानेश्वर, पाहीं । जाती लवलाहीं लोटांगणीं. ॥ ९८ ॥
चांगदेवी चौघे लोटांगणा जाती; । तेहीं तयांप्राती आलिंगिलें. ॥ ९९ ॥
परस्परें नमन, आलिंगन झालें, । कुशल पुशिलें परस्परें. ॥ १०० ॥
भेट जाली वटवृक्ष असे तेथें. । ' विश्रांति, ' म्हणती, ' येथें करा. ' ॥ १०१ ॥
ज्ञानदेव ऐसें मुखीं बोलियेले । ऐकूनि बसले वटच्छाये. ॥ १०२ ॥
येथूनि चरित्र पुढें आईकावें. । अवधान द्यावें श्रवणासि. ॥ १०३ ॥
संतांचें चरित्र करितां श्रवण । पातकें दारुण दग्ध होती. ॥ १०४ ॥
वदतसे चरित्र श्याम मरुद्गण, । कृपा करी पूर्ण चांगदेव. ॥ १०५ ॥
इति चांगदेवप्रकरणे चांगदेवज्ञानेश्वरभेटीनिरूपणं नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥

चतुर्थ अध्यायीं कथन ऐसें. । चांगया ज्ञानें बोध केला. ॥ १ ॥
अनुग्रह मुक्ताईचा होईल चांगदेवा, । इतिहास बरवा परिसावा. ॥ २ ॥
निवृत्ति ज्ञानदेव आणि तो सोपान । सांगताती खूण, मुक्ताबाई. ॥ ३ ॥
' चांगदेवा ऐसा अनुग्रह करावा । मार्ग दाखवावा ब्रह्मज्ञान. ' ॥ ४ ॥
ऐसा हा विचार करूनियां दृढ, । मग काय पुढें करिते जाले ? ॥ ५ ॥
विश्रांतिवटाच्या छायेसि बैसती, । चांगदेवाप्रति बोलताती. ॥ ६ ॥
येथूनि बोलणें तयांचे मुखींचें । अभंग वोवींचें कौतुक. ॥ ७ ॥
निवृत्ति, ज्ञानेश्वर बोलती, चांगदेवा । स्वात्मसुख अनुभवा दावूनियां, ॥ ८ ॥
याचे मुखींचें अभंग परिसावें, । जयांत बरवें ब्रह्मज्ञान. ॥ ९ ॥
विश्रांतिवटीं चांगदेवाभेटी; । परस्परें कसोटी अनुभवाची. ॥ १० ॥
निवृत्ति ज्ञानेश्वर म्हणती, ' तुह्मी थोर, । सर्वज्ञ, उदार, आह्मांलागी. ॥ ११ ॥

षट्चक्र भेदूनि साधिलें योगासि. । ऋद्धि सिद्धि दासी स्वयें केल्या.' ॥१२॥
ऐकूनि उत्तर, जोडूनि दोन्ही कर, । केला नमस्कार दीर्घदंडें. ॥ १३ ॥
संतांचें दर्शन, शुद्ध झालें मन; । गेला अभिमान विरोनियां. ॥ १४ ॥
काळ विवंचना वांचलें हें शरीर; । पहा, योगेश्वर तुम्हां ऐसे. ॥ १५ ॥
वटेश्वर चांगा करीतसे विनंति, । 'तोडा माझी गुंती ससाराची. ॥ १६ ॥
चवदा शत वरुषें भूमिगत होती । जगासि दाविती दंभधर्म. ॥ १७ ॥
'व्याघ्रावरि बैसोनि व्याळ करीं धरणें; । मीतूंपणें जिंकू जाणें तीव्र तेजें.॥१८॥
ऋद्धि, सिद्धि, नाना साधन, बाणल्या.'।' परी त्या लागल्या तुझ्या मुळीं.॥१९॥
'परिसा माझी मात; ऐकावी महेशा,' । 'साक्षात महेश तूंचि होसी.'॥२०॥
'तुझी तुज शुद्ध लागली समाधि.' । 'वाउगी उपाधि सांडीं, राया. ॥ २१ ॥
'तुझी माझी भेटी कर्पूर अग्नीसि गोष्टी.' । 'पाहतां शेवटीं दोन्ही नुरे. ॥ २२ ॥
अभिमानें नाशी; तमें नाडिलासि; । 'बोलों ये संतांसि, सांगों एक.' ॥ २३ ॥
'कोणतें साधन? कोण तुझें सुख?' । 'बोलों सुखदुःख आपलें तुझें.' ॥२४॥
ऐसेपरि तूतें जाण प्रबोधिलें. । निवृत्ति साधिलें आत्मसुख. ॥ २५ ॥
ज्ञानदेव म्हणे 'चांगावटेश्वरा, । चालें पां निजघरा निजे निज. ॥ २६ ॥
योग तो कठीण; साधितां साधन, । तेणें, गा, चिद्घन न पाविजे. ॥ २७ ॥
यालागीं आतां सुगम हें तूज; । माझें निज गूज अंतरींचें. ॥ २८ ॥
इंद्रियें कोंडावीं, आंवरावें मन, । सहज ब्रह्मज्ञान लाधशील. ॥ २९ ॥
जेथें जेथें मन धांवूनियां जाय, । तेथें तेथें आपण एक पाहें. ॥ ३० ॥
ज्ञानदेव म्हणे, 'चांगया, होईं तूं निर्गुण; । कळेल तुज खूण वटेश्वरीं.॥३१॥
रजो गुण सांडीं, तमोगुण खंडीं, । सत्वगुण मांडीं, चांगया, तूं, ॥ ३२ ॥
काळाचा चोरटा झालासि तूं धीटा; । परि आत्मज्ञान चोहाटा कळलें नाहीं.॥३३॥
तरि हे कर्मठता तामसी उद्भट, । न कळे ते वाट योगियांची. ॥ ३४ ॥
ज्ञानदेव म्हणे, 'संत तुम्ही खरे; । तमोगुणाचे झरे आटवा वेगीं. ॥ ३५ ॥
शब्दज्ञान उदड करिती कुचाळे, । परि ते निराळे अनुभव. ॥ ३६ ॥ सहा,
चार, अठरा, व्याकरणें, पढती; । परि ते निराळें स्वयंज्योति, रे चांगया. ॥३७॥
निराळी म्हणावी, तरि तेचि अघवी।डोळां भरूनियां पाहवी'ज्ञानदेव म्हणे.।३८॥
वटाचीये छाये बोलणें हें झालें; । माध्यान्हासि आलें रविमंडळ. ॥ ३९ ॥
म्हणती ज्ञानदेव, 'ग्रामामध्यें चला; । स्नानसंध्या करा माध्यान्हिक.'॥४०॥
ऐसें बोलूनियां तेथूनि उठत । ग्रामामध्यें येत आश्रमासि ॥ ४१

ज्ञानदेव म्हणती, ' मुक्ताबाई आतां । पाकाची सिद्धता करा वेगीं. '॥ ४२ ॥
ऐशी आज्ञा ज्ञानदेवाची ऐकिली, । मुक्ताबाई उठली स्नानालागीं, ॥ ४३ ॥
घेऊनियां मृण्मयपात्रीं स्नानासि उदक. । थोर कौतुक तेथें झालें. ॥ ४४ ॥
तंव चांगदेव लघुशंके जाती. । मुक्ता देखती नग्न दृष्टीं. ॥ ४५ ॥
देखतांचि नग्न माघारे फिरत; । मुक्ताबाई बोलत तयांप्रति ॥ ४६ ॥
सदेह तुमचे जीवींचा नाहीं गेला । आत्मस्वरूपाला अनोळखी. ॥ ४७ ॥
तुमचे देहींचा काय आत्मा असे ? । माझे देहीं वसे काय आम्हीं ? ॥ ४८ ॥
गाई, म्हैशी आणि कुत्तरीं, मांजरीं । काय करिती वस्त्र परिधान ? ॥ ४९ ॥
मृत्तिकेच्या भिंती उदंड कोनाडीं; । काय तें उघडीं न येती दृष्टीं ? ॥ ५० ॥
स्वरूपावरि दृष्टि ठेवा बरव्या रीती । आत्मज्ञान मति विचारूनि. ' ॥ ५१ ॥
चांगदेव ऐसे ऐकूनियां बोल । म्हणती ' सखोल ज्ञान यांचें. ॥ ५२ ॥
यांचिया; ज्ञानाचा न कळे मज पार, । विश्वीं विश्वंभर जैसा असे. ' ॥ ५३ ॥
म्हणती ' कांहीं एक करूं कौतुक, । जेणें विश्वलोक टक पडे. ' ॥ ५४ ॥
आश्चर्य करूनि स्वस्थानीं बैसले. । शिष्य बोलियले तयांप्रति; ॥ ५५ ॥
' क्षुधा स्वामी मज बहू लागलीसे, । विलंब पाकासि दिसतसे. ' ॥ ५६ ॥
धान्य जोंधळ्याचें त्यांनीं आणविलें. । मस्तकीं ठेंविलें आपुल्या हातें. ॥ ५७ ॥
तडतडां लाह्या फुटती जोंधळ्याच्या, । भुजारी भट्टीच्या जेंवि भाजीं. ॥ ५८ ॥
ज्ञानेश्वर म्हणती निवृत्ति, सोपानासि, । ' अजूनि सिद्धाईसि भुललेती. ' ॥ ५९ ॥
म्हणती निवृत्ति, ' समागमें तुमच्या । खुणा अध्यात्माच्या कळती जेव्हां, ॥ ६० ॥
मिथ्या भासे तेव्हां भास सिद्धाईचा; । चवदाशें वर्षांचा देह मिथ्या. ' ॥ ६१ ॥
ज्ञानदेव ऐसें म्हणती मुक्ताईस, । ' त्यांहीं कौतुकास थोर केलें, ॥ ६२ ॥
जोंधळ्याच्या लाह्या होती मस्तकावरि. । सिद्धाईची थोरी दाखविली; ॥ ६३ ॥
सोपानासि तुह्मीं जवळीं बैसवावें; । कौतुक दाखवावें भोजनकाळीं. ॥ ६४ ॥
तयाचे पृष्ठीवरि करा तुम्हीं मांडे; । ऐसी परवडी दाखवावी. ' ॥ ६५ ॥
बाहेर येऊनि ह्मणती, चांगदेवा, । स्वयंपाक अवघा झाला असे. ॥ ६६ ॥
सत्वर उठावें आतां भोजनासि, । करावें स्नानासि, विलंब झाला. ॥ ६७ ॥
ऐकूनियां सर्व गेले इंद्रायणीं; । स्नानासि करूनि येते झाले. ॥ ६८ ॥
येऊनियां मग गतीसि बैसती. । पूजा करिताती ज्ञानदेव. ॥ ६९ ॥
चांगयाची पूजा ब्राह्मणांसहित । करूनि ह्मणती, ' कृतकृत्य. ॥ ७० ॥
संतांचें पूजन, देवपूजा हेचि; । ऐसी हे वेदाची आज्ञा असे. ' ॥ ७१ ॥

ब्राह्मणांची पूजा केली बरव्या रीती । मग वाढितांती पात्रीं अन्न. ॥ ७२ ॥
शाका आणि भात वाढियेले मांडे. । पाहती चहूंकडे पाक कोठें. ॥ ७३ ॥
चांगदेव पाहती कोणी कडे पाक, । तंव आलोलिक देखियलें. ॥ ७४ ॥
सोपानपृष्ठींचें करूनि खापर । जठराग्नि तीव्र चेतविला. ॥ ७५ ॥
मांडा करूनि पृष्ठीवरि टाकितांची । क्षण न लागतांची सिद्ध होय. ॥ ७६ ॥
ऐसें कौतुक दृष्टीस देखिलें; । भोजन केलें मौनेंकरुनि. ॥ ७७ ॥
साष्टांग प्रणाम केला मुक्ताईतें. । म्हणे, 'आतां, 'माते, कृपाकरी ॥ ७८ ॥
लिखिताचा अर्थ सांगा यथासांग; । जगीं संतसंग थोर असे.' ॥ ७९ ॥
ह्मणती, "ज्ञानदेवा अर्थ विचारावा. । शिष्य एक द्यावा बळी त्यासि' ॥ ८० ॥
म्हणती, 'प्रातः काळीं करूं हा विचार. । निवृत्ति, ज्ञानेश्वर उठीयेले. ॥ ८१ ॥
निद्रा करावया उठले चांगदेव, । तेथें शिष्य सर्व करिती सेवा. ॥ ८२ ॥
आस्तृण घालूनि सेवा करितांती; । सुखें पहूडती योगीराज. ॥ ८३ ॥
लागलीसे निद्रा स्वामींसि जाणूनि । शिष्य विचारासि करिते झाले. ॥ ८४ ॥
'प्रातःकाळीं बळी मनुष्याचा द्यावा; । कवणाचीया जीवावरि नेणों. ॥ ८५ ॥
ज्याचा जीव तया एकचि हा असे. । स्वामींस तो बहु दिसे समुदाव. ॥ ८६ ॥
येथूनियां आतां गमन करावें, । जोंवरि नुगवे दिनकर.' ॥ ८७ ॥
ऐसें विचारूनि गेला सर्व मेळा । आपुलाल्या स्थळा, जेथिंचा तेथें. ॥ ८८ ॥
रात्र ते संपली; जाला प्रभातसमय; । आले ज्ञानदेव दर्शनासि. ॥ ८९ ॥
चांगदेव जेथें निद्रिस्त आसनीं । त्या स्थळीं जाऊनी बैसतांती. ॥ ९० ॥
तंव चांगदेव करिती प्रातःस्मरण; । ज्ञानदेवें नमन केलें तयां. ॥ ९१ ॥
परस्परें नमन झालें उभयतांचें, । सार्थक जीवाचें करणें आतां. ॥ ९२ ॥
'प्रातःकाळ झाला, सुमुहूर्त असे; । मनुष्य बळीस आणा वेगीं.' ॥ ९३ ॥
ऐकूनि चांगदेवें शिष्य पाचारिले. । कोणीही न बोले आळविल्या ॥ ९४ ॥
चवशत शिष्य रात्रीमध्यें गेले. । एकले राहिले चांगदेव. ॥ ९५ ॥
बोलती ज्ञानदेवा, 'एकला मी असें । मज बळीदाना योजा स्वामी.' ॥ ९६ ॥
ऐकूनि ज्ञानदेव हंसून बोलिले. । 'शरीर दंडिलें व्यर्थ तुम्ही. ॥ ९७ ॥
चवदाशें वरुषें व्यर्थ श्रम केला; । शिष्यसमुदायाला मिळवूनि. ॥ ९८ ॥
शेवटीं ते कोणी न येती कामासी । ऐशा निश्चयासि कळों आलें.' ॥ ९९ ॥
इतकें बोलणें ऐकूनि ज्ञानयाचें । भरे वैराग्याचें वारें अंगीं. ॥ १०० ॥
साष्टांग नमन केलें ज्ञानदेवा. । 'अनुग्रह बरवा करा आतां.' ॥ १०१ ॥

येथूनियां पुढें अनुग्रह अभंग, । जेणें होय सांग ब्रह्मज्ञान. ॥ १०२ ॥
निवृत्ति, ज्ञानेश्वर आणि तो सोपान । सांगितली खूण मुक्ताबाई. ॥ १०३ ॥
आधींच शुद्ध पात्र, वैराग्य तापलें, । गूज सांगितलें चांगदेवा. ॥ १०४ ॥
मी कोण तें पहावें, आपणातें ओळखावें,। स्वरूपीं रमावें, रात्रंदिवस. ॥ १०५ ॥
त्रिगुणावरुतें ज्ञान पैं निश्चित; । तयावरुतें घेईं, बापा. ॥ १०६ ॥
मुक्ताबाई म्हणे, होईं तूं सावध. । सांगिजेल बोध पुढील तो. ॥ १०७ ॥
ऐसा अनुग्रह मुक्ताईनें केला. । पूर्ण बोध झाला चांगदेवा. ॥ १०८ ॥
चराचरीं अवघा भासे विश्वंभर. । स्वरूपीं सादर मन झालें. ॥ १०९ ॥
चौदा विद्येचा, चौसष्टी कळेचा, । गळत सिद्धाईचा अभिमान. ॥ ११० ॥
ऐसें पूर्ण ज्ञान बिंबलेंसे अंगीं. । अवघा भासे जगीं पांडुरंग. ॥ १११ ॥
पांडुरंग ध्यानीं, पांडुरंग मनीं, । निरंजनीं, वनीं, पांडुरंग. ॥ ११२ ॥
अवघें चराचर भासे ब्रह्मरूप, । ऐसें गुरुकृपें ज्ञान झालें. ॥ ११३ ॥
नोहे ब्रह्मज्ञान सद्गुरुवांचून । वेदशास्त्र पुराण वेवादती; ॥ ११४ ॥
म्हणोनि सद्गुरूचा अनुग्रह घ्यावा; । सद्भाव धरावा एकनिष्ठ. ॥ ११५ ॥
आळंदीस ऐसे राहिले एक मास । समागमें देख ज्ञानेशाच्या. ॥ ११६ ॥
पुसती ज्ञानेश्वर, 'तुम्ही येथें येऊनि । गेलासे क्रमूनि मास एक. ॥ ११७ ॥
येऊनियां येथें काय साधियेलें, । तें वर्म आम्हां कळलें नाहीं. ॥ ११८ ॥
आमुच्या पत्राचें द्यावें प्रतिउत्तर । ऐसें ज्ञानेश्वर बोलिलेती. ॥ ११९ ॥
ऐकूनी प्रणाम केला ज्ञानदेवा. । आपुल्या अनुभवा बोलताती. ॥ १२० ॥
"वेळना वोळसे पूर आला, । तेथें जन बुडाला, बाईयांनों. ॥ १२१ ॥
'बुडाला' 'बुडाला' म्हणती, । परि बुडाल्याची शुद्धि न घेती. ॥ १२२ ॥
'ऐल बुडाला' 'पैल बुडाला' । कोरडेचि डोहीं जन बुडाला. ॥ १२३ ॥
निवृत्ति सांगडी; मुक्ताबाई तारू; । चांगा पैलपारू उतरला." ॥ १२४ ॥
लिखिताचें उत्तर उत्तरपंचविशीं । बोलिले ज्ञानेशासि आत्मसुख. ॥ १२५ ॥
ऐकूनि ज्ञानेशाचें समाधान झालें. । सार्थक हें केलें म्हणती तुम्ही. ॥ १२६ ॥
बोले मुक्ताबाई. 'चवदाशें वरुषांचें । कलेवर तुमचें अजरामर. ॥ १२७ ॥
आतां येथूनियां जावें पंढरपुरा, । संतांच्या माहेरा, भक्तिभावें.' ॥ १२८ ॥
मुक्ताबाई ऐसी आज्ञा देत असे. । नमन चौघांस करिते झाले. ॥ १२९ ॥
साष्टांग प्रणिपात तयांलागीं केला. । गुरुपूजनाला आरंभिलें. ॥ १३० ॥
षोडशोपचारीं पूजा वेदमंत्रीं; । सदृढ भावार्थ गुरूचे पायीं. ॥ १३१ ॥

आमुचिये वंशीं तुज जे पूजिती, । संतति संपत्ति पावतील; ॥ ९८ ॥
तुझिये पूजेचा व्यतिक्रम करिती, । दरिद्र भोगिती जन्मवरि. ॥ ९९ ॥
चांगदेवें ऐसें ऐकूनियां बोला । तयांचे वंशासि वर दिला. ॥ १०० ॥
तेथूनियां पुढें जाती द्वारकेस, । बहु यात्रा असे समागमें. ॥ १ ॥
यादव नामक यात्रेंत ब्राह्मण । धारुरीचा जाण, देशपांड्या. ॥ २ ॥
सवें पत्नी आला द्वारकेचे यात्रे; । चांगया सत्पात्र देखियेला. ॥ ३ ॥
नमूनि चांगयासि अनुग्रह घेतला; । सर्वभावें झाला शिष्य त्याचा ॥ ४ ॥
पत्नी गरोदर यादवाचे संगें । करूनि तिचा त्याग पुढें गेला. ॥ ५ ॥
केवळ ब्रह्मारण्य असे महीवरि; । राहिली अंतुरी एकली ते. ॥ ६ ॥
प्रसूतसमय सन्निधचि आला, । धांवा करीतसे चांगयाचा. ॥ ७ ॥
कृपाळू माउले, दीनाचे वत्सले, । अनाथाचे लळे पाळिसी तूं. ॥ ८ ॥
चांगया, चक्रपाणी, सद्गुरु, जननी, । मज ये निदानीं पाव आतां. ॥९ ॥
भ्रतार टाकूनि गेला असे मज; । आतां सर्व लाज रक्षीं माझी. ॥ ११० ॥
चांगयाचे नांवें धांवा तिनें केला, । संकटीं पावला केशवराज. ॥ ११ ॥
भक्ताचें संकट पडे देवावरी । तात्काल श्रीहरि पावलेती. ॥ १२ ॥
द्वारकेचा कृष्ण आलासे धांवण्या. । तेथें एक निर्माण गांव केलें. ॥ १३ ॥
वृद्ध एक विधवा, नांव कृष्णाबाई, । आली लवलाहीं तियेपाशीं. ॥ १४ ॥
'कोठिल तूं, बाई,' पुसे वर्तमान, । ती म्हणे, 'मी दीन यात्रेकरू. ॥१५॥
चांगयासांगातें जात होतों यात्रे । आम्ही स्त्रीपुरुष उभयतां. ॥ १६ ॥
गरोदर असें नव मास झाले. । भ्रतारें त्यागिलें अरण्यांत. ॥ १७ ॥
भ्रतार विदेही असे आत्मज्ञानी । मजला टाकूनि गेला असे.' ॥ १८ ॥
ऐकूनि करुणा कृष्णाबाई बोले, । 'मज पाठविलें असे चांगदेवें. ॥ १९ ॥
सांगितला तूझा असे प्रसूतकाळ, । आलें मी तात्काळ धांवूनीयां. ॥१२० ॥
सत्वर ऊठ, आतां जाऊं गांवामध्यें; । तुझे जीवाचा वेध कळला असे. ॥२१ ॥
प्रसूतिसमयास जाणूनियां गेली । ते ग्रामांत आपुले गृहासि. ॥ २२ ॥
झाली ती प्रसूत, तीस पुत्र झाला; । मग कृष्णाबाईला काय बोले. ॥ २३ ॥
'तूंचि पिता, माय, बहीण, जाण. । तूज मी उत्तीर्ण काय होऊं ?' ॥२४॥
म्हणे कृष्णाबाई 'चिंता तूं न करीं. । चालवील हरि सर्व तुझें. ॥ २५ ॥
ऐसें वर्तमान झालेंसे इकडे. । पुढें काय झालें ऐकावें. ॥ २६ ॥
चांगदेव यात्रेसहवर्तमान । द्वारकेसि, जाण, पावलेती. ॥ २७ ॥

गोमतीचें स्नान करूनियां तीहीं । राउळांत, पाहीं, जाते झाले. ॥ २८ ॥
गेले राउळांत कृष्णदर्शनासि, । मूर्ति हे ध्यानांत आणितातीं. ॥ २९ ॥
नोहे दर्शन ध्यानासि आणितां, । विस्मय हा चित्ता बहुत झाला. ॥ १३० ॥
विस्मय होऊनि पाहे ज्ञानचक्षू, । तंव लक्ष तेथें पावलेंसे. ॥ ३१ ॥
महीचे तटाकीं प्रसूत यादवपत्नी, । गेले ते रुक्मिणीपति तेथें. ॥ ३२ ॥
चांगयाची यात्रा करीन जाणूनि । संकट जाणूनि गेले देव. ॥ ३३ ॥
तिचें बाळंतपण केलें असे देवें, । पूर्ण चांगयासि कळों आलें. ॥ ३४ ॥
तेथूनि ध्यानासि आलें महीतट, । तात्काळ निकट आलें असे. ॥ ३५ ॥
तंव एक मास बाळंतपणीं । देखिली अंगणीं कृष्णाबाई. ॥ ३६ ॥
उचलोनि लेंकरूं घेतलें वोंटिसि । म्हणतसे शिष्यासि पुत्र झाला. ॥ ३७ ॥
हा शिष्य तुमचा असे निरंतर; । वंशपरंपरा तुम्ही गुरु. ' ॥ ३८ ॥
ऐसें बोलूनि शिशु वोंटिसि घातलें. । बाळंतिणीनें केलें दंडवत ॥ ३९ ॥
तंव कृष्णाबाई झालीसे अदृश्य, । दर्शन चांगदेवासि देऊनियां. ॥ १४० ॥
फिरूनि चांगदेवें बाहिलें कृष्णाबाई; । तंव ते ठायीं न पडे दृष्टी. ॥ ४१ ॥
म्हणे, " द्वारकेचा कृष्ण येथें आला. । रूपें तोंचि झाला कृष्णाबाई. ॥ ४२ ॥
धन्य तुमचें शिष्यपण स्थापिलें श्रीकृष्ण. । गुरुत्व दिधलें पूर्ण आमुचे वंशीं. ॥ ४३ ॥
निरंतर नाम स्थापिलें हें कृष्णे. । वंशीं होती बरवे हरिभक्त. ॥ ४४ ॥
वंशाची उत्पत्ति ऐशी निरंतराची. । जालासि देवाची कृपा तया. ॥ ४५ ॥
यादवपत्नी आणि पुत्रासि घेतलें, । चांगदेव आले द्वारकेसि. ॥ ४६ ॥
यादवासि पत्नीपुत्रां भेटविलें. । नामासि ठेविलें महादेव. ॥ ४७ ॥
द्वारकेची यात्रा करूनि फिरले । पुनरपि आले पुण्यस्तंभा. ॥ ४८ ॥
येऊनि पुण्यस्तंभा सोमेश्वरासि नमिलें; । दंडवत केलें गौतमीसि. ॥ ४९ ॥
केशवराजाचें दर्शन घेतलें; । सर्वही भेटले इष्टमित्र. ॥ १५० ॥
ग्रामा आल्या पांचसात दिवस झाले. । पंढरीचें आलें वर्तमान. ॥ ५१ ॥
बेदरींचा राजा बेदरी पातशहा; । ब्राह्मणांसि बहू छळियेलें. ॥ ५२ ॥
हिंदुधर्म जितुके तितुके वर्जियले. । राऊळ विध्वंसिलें पंढरीचें. ॥ ५३ ॥
केलीसे मशीद महाद्वार मोडून, । सात मास पूर्ण झाले यासि. ॥ ५४ ॥
मूर्ति सिंहासनाहूनि आच्छादिली, । गुप्त, हो, ठेविली बडव्यांनीं. ॥ ५५ ॥
ऐसें वर्तमान ऐकूनि श्रवणीं, । पाहिलेंसे ज्ञानी ज्ञानचक्षू. ॥ ५६ ॥
ज्ञानचक्षू पहाती तंव असे सत्य. । उदास तें चित्त बहुत झालें. ॥ ५७ ॥

पुण्यस्तंभाहूनि जाती बेदरासी । सांगातें शिष्यांसि घेऊनियां. ॥ ५८ ॥
दिंडी, टाळ, विणे, पताका घेऊन । करिती कीर्तन नित्य मार्गी. ॥ ५९ ॥
जातां कवतुक झालें एक वाटे । जंगमाचा मठ मार्गी होता. ॥ १६० ॥
मल्लिकार्जुन नाम गुरु जंगमाचा । ऐके चांगयाचा कीर्तिघोष. ॥ ६१ ॥
येथूनियां पुढें अद्भुत चरित्र । परिसावें सदा संतजनीं. ॥ ६२ ॥
मरुद्गण वंशीं कोयेरीचा सुत । भावें शरणांगत संतां पायीं. ॥ १६३ ॥

**इति श्रीचांगदेवप्रकरणे षष्ठोऽध्यायः**

चांगेश बुधें थोर सिद्ध झाला. । संजीवनी विद्येला साधियेलें. ॥ १ ॥
ऐसें वर्तमान ऐकूनि जंगमानें. । उभयतां श्वान घरचे होतीं. ॥ २ ॥
चांगयाचें नाम ठेविलें श्वानांसि. । त्या नामें तयासि पाचारीत. ॥ ३ ॥
म्हणूनि चांगदेव चालिले मठावरूनि, । गर्वाची झाडणी करावया. ॥ ४ ॥
दिंडीसीं पताका देखतीं दुरून. । ह्मणे मल्लिकार्जुन, ' काय येतें? ' ॥ ५ ॥
शिष्य सांगताति, 'आले चांगदेव.' । ह्मणे कवतुक बरवें करूं आतां. ॥ ६ ॥
बोलतां चालतां आले मठापाशीं । शरणांगत अयासि बोलीयलें. ॥ ७ ॥
मल्लिकार्जुनें वरूनि टाकिलें आसन । म्हणे हें घेऊन बसावें तुह्मी. ' ॥ ८ ॥
आसन अंतरिक्ष राहिलेंसे, जाण. । केलें टाने टोने जंगमानें. ॥ ९ ॥
चांगदेवें ऐसें देखिलें लोचनीं; । बिभूति मंत्रूनि फुंकियेली. ॥ १० ॥
बिभूत प्रोक्षितां लागलासे अग्न । वरच्यावरि आसन जळत असे. ॥ ११ ॥
न पडे भूमीसि देखूनि आसन, । जंगम धांवून पायीं लागे. ॥ १२ ॥
बळकट पायीं धरिलें तेंणें । म्हणें, ' हें आसन गुरूचें असे. ॥ १३ ॥
सत्वर करणें याचें संरक्षण । तुज मी शरण आलों असें. ' ॥ १४ ॥
करुणावचन ऐकूनि तेहीं । पाडिलें लवलाहीं भूमीवरि. ॥ १५ ॥
जंगमानें शिष्यासि इशारत केली, । श्वानें लपविलीं तळवरांत. ॥ १६ ॥
केलासें जंगमानें तयासि पाहुणेर. । पाक ह्मा सत्वर सिद्ध झाला. ॥ १७ ॥
म्हणती चांगदेव ' मठींचे सर्व जीव, । अन्न हें बरवें द्यावें त्यांतें. ॥ १८ ॥
पशु, पक्षी, माशी, मुंगीसि यें जाण । वाढियेलें अन्न पात्रांमध्यें. ॥ १९ ॥
विस्तारूनि पात्रें शिवपूजा म्हणत । कंठींचें वस्त्र सोडियलें. ॥ २० ॥
वस्त्रें सोडूनिया लिंग पहाताती । परस्परें बोलती, न दिसे लिंग ! ॥ २१ ॥
अवघे मिळूनियां आले गुरूपाशीं, । सर्व वर्तमानासि सांगितलें. ॥ २२ ॥

गुरूनें पाहिला आपलाही देव; । तंव न दिसे शिव ऐसें झालें. ॥ २३ ॥
म्हणती चांगदेव, 'सत्वर पूजा शिव । आम्हीं आपुला देव पूजियेला .॥२४॥
ऐकूनि मल्लिकार्जुन वचन बोले. । म्हणे; ' शिव गेला कैलासासि. ॥ २५ ॥
तुमचीं भोजनें होऊं द्यावीं आतां, । आम्हां उमाकांत क्षोभलासे. ' ॥ २६ ॥
हांसूनि चांगदेव म्हणती; ' श्वान आणा; । लिंगासि प्राशना केलें त्यानें. ॥२७॥
आणूनियां श्वान पुढें उभे केले. । तयांसि बोलिले चांगदेव. ॥ २८ ॥
चांगदेवा, देईं लिंग पूजनाला । बहु भोजनाला उशीर झाला. ॥ २९ ॥
ऐकूनि वचन मुख केलें वरुतें; । सर्वांचिया लिंगांतें वमतिसे. ॥ ३० ॥
ढीग केला मोठा, लिंगांतें वमूनि; । आपुलें ओळखूनि घ्यावें आतां. ॥ ३१॥
आपुलालीं लिंगें घेतलीं ओळखूनि, । गर्व होतां मनीं, गळित झाला. ॥ ३२ ॥
चांगदेवें आज्ञा केलीसे सर्वांसि, । ' लिंग पूजनासि मुखीं धरा. ' ॥ ३३ ॥
तैं पासूनि लिंगें मुखांत घालिती, । ऐशी हे पद्धति चाले आतां- ॥ ३४ ॥
सर्व मंडळीचें झालेंसे भोजन; । मग मल्लिकार्जुन बोलियेले. ॥ ३५ ॥
शरण असें तुमचे पायांसि । कृपा अनाथासि असों द्यावी. ॥ ३६ ॥
ऐसा चमत्कार दाखविला त्यासि । पुढें बेदरासि जाते झाले. ॥ ३७ ॥
माध्यान्ह झालासे, बेदरा पावले; । स्नाना उतरले तळ्या पाळी. ॥ ३८ ॥
तंव राजगृहींचा आलासे ब्राह्मण; । जोशी तो निपुण राजापाशीं. ॥ ३९ ॥
पुसतसे शिष्यांसि, ' हे कोण ब्राह्मण ? । यांचें नाम काय ? कोठें असती ?॥ ४०॥
बोलणें ऐकूनि शिष्य देती उत्तर, । ' चांगावटेश्वर आले येथें. ' ॥ ४१ ॥
साष्टांग नमन करितसे, । वर्तमान सर्व सांगितलें. ॥ ४२ ॥
राजा बहू असे दुष्ट या स्थळींचा, । देखेल तुमचा समारंभ. ॥ ४३ ॥
देखूनि समारंभ छळील तुम्हांसि, । कर्जावें तयासि तरि दुःखी असे. ॥ ४४॥
पुसती चांगदेव ' दुःख त्या कशाचें? । वर्तमान तयाचें सांगा मज. ' ॥ ४५ ॥
ऐकूनि ब्राह्मण सांगे समाचार, । ' ऐका सविस्तर, स्वामी, तुम्ही. ॥ ४६ ॥
बहू प्रीतिपात्र राजयाची पत्नी, । पावली मरण सर्पदंशें. ॥ ४७ ॥
बहू धन्वंतरीं केला प्रयत्न तिचा. । न चले कवणाच्या उपायासि. ॥ ४८ ॥
जीव गेला तिचा, पावली मरण, । दुःख हें दारुण राजा करी. ॥ ४९ ॥
तीन दिवस झाले तियेच्या प्रेतासि । चिरूनि उदरासि रक्षियेलें. ॥ ५० ॥
उदईक प्रेत पाठवितो रोजा । दुःख बहु राजा करितसे. ' ॥ ५१ ॥
एसें वर्तमान ऐकूनि चांगयानें, । म्हणे, ' सजीव प्राण होईल ती. ॥ ५२ ॥

ऐसा विठ्ठलाचा आहे चमत्कार, । निर्जीव शरीर, सजीव होय. ' ॥ ५३ ॥
ऐकूनि ब्राह्मण मनीं आनंदला, । सत्वर तो गेला नगरामध्यें. ॥ ५४ ॥
सर्व वर्तमान सांगे रायापाशीं । ' मृत्यमनुष्यासि उठविती '. ॥ ५५ ॥
चवदाशें वर्षांचे सिद्ध येथें आले; । आश्वासन दिधलें तेहीं मज. ॥ ५६ ॥
ऐकूनियां ऐसें राजा बोले वचन. । ' तयांसि घेऊन यावें आतां '. ॥ ५७ ॥
राजयाचें वचन ऐकूनि, ब्राह्मण । तयांसि घेऊन गृहा आला. ॥ ५८ ॥
आपुल्या गृहा तयांसि आणिलें. । रायासि सांगितलें वर्तमान. ॥ ५९ ॥
राजा ह्मणे, ' तयां करूनी विनंति । आणा सभेप्रति, करा कार्य '. ॥ ६० ॥
आलासे ब्राह्मण चांगदेवापाशीं. । ' बोलाविती तुह्मांसि राजा सभे. ' ॥ ६१ ॥
पाचारितां विप्रें सत्वर उठिले; । राजद्वारा गेले समारंभें. ॥ ६२ ॥
राजद्वारा येतां सन्मानिले रायें; । परि येक संशय चित्तीं असे. ॥ ६३ ॥
कैसें होईल कार्य? हें तों दिसे सोंग. । बहुत उद्वेग मनीं वाटे. ॥ ६४ ॥
चांगदेवें मनीं केलेंसें दढातें. । ह्मणे, ' अघटित करणी करूं. ॥ ६५ ॥
आधारीची विभूत घेतली ते काळीं; । आपुली मंडळी प्रोक्षियली. ॥ ६६ ॥
प्रोक्षितां विभूति द्विधा रूप दिसे; । ज्याचें तया दिसे दर्शन. ॥ ६७ ॥
हिंदूंसि दिसती ब्राह्मण हे थोर; । पीर पैगंबर यवनदृष्टी. ॥ ६८ ॥
एक रूप द्विधा भासतसे तेथें. । राजा दोहीं हातें नमितसे. ॥ ६९ ॥
राजा म्हणे, ' माझें असे हें दैवत । ब्राह्मण म्हणत कोण यांसि ? ॥ ७० ॥
म्हणे चांगदेव ' आह्मी हरीचे दास. । तुझिया कार्यास सांगें आतां '. ॥ ७१ ॥
ऐकूनि राजा बोले तयांप्रति, । माझी हे विनंति परिसावी, ॥ ७२ ॥
' मरण पावली माझी ज्येष्ठ पत्नी. । सजीव करून उठवावें तीसि '. ॥ ७३ ॥
विभूति मंत्रूनि दिधली राजाकरीं; । ह्मणे, 'झडकरी लावी तीसि. ॥ ७४ ॥
विभूति घेऊनि गेला मंदिरांत; । पुढें हा वृत्तांत कैसा झाला ? ॥ ७५ ॥
लाविली विभूती तियेचे कपाळीं, । तंव तिनें आरोळी दिधलीसे, ॥ ७६ ॥
हांक मारूनियां उठलीसे बळें, । केशातें मोकळे डोलतसे. ॥ ७७ ॥
देखोनियां राजा झालासे घाबरा, । पूर्ण समाचारा पुसतसे. ॥ ७८ ॥
तंव तियेप्रति नसे देहभान; । राजियाचें मन चिंतावलें. ॥ ७९ ॥
येऊनियां चांगयासि सांगे वर्तमान. । 'फिरूनि आला प्राण; परि भ्रम देहीं'. ॥ ८० ॥
फिरूनियां दुजी विभूति दिधली. । ह्मणती ऐसी बोली बोल तिशीं. ॥ ८१ ॥
' तुझे जें मनीं असेल इच्छित, । पुरवीन आर्त, भाक माझी. ' ॥ ८२ ॥

ऐसें बोलूनि लावावी विभूति, । तुमच्या कार्यासि सिद्धि पावे. ॥ ८३ ॥
विभूति आणूनि पुन्हा लावियेली; । आम्ही दिधली तयेप्रति. ॥ ८४ ॥
'तुझे जे मनींची आहे अपेक्षा, । पुरवीन इच्छा सर्व जाण'. ॥ ८५ ॥
ऐकूनि वचन बोले राजपत्नी. । 'जेहीं मज प्रयत्नीं फिरविलें, ॥ ८६ ॥
तयांची ते आज्ञा करा तुम्ही मान्य; । तेव्हां देहभान स्वस्थ माझें. ॥ ८७ ॥
ऐकूनि रायानें वचन केलें मान्य, । झालें देहभान यथास्थित. ॥ ८८ ॥
राजा विचारित वर्तमान पूर्व; । दिलें प्रत्युत्तर यथास्थित. ॥ ८९ ॥
संतोषला राजा, आलासे बाहेरि, । सर्व समाचार सांगितला. ॥ ९० ॥
रत्नें, मुक्ताभरणें, पुढें ठेवी द्रव्य; । देखूनि चांगदेव बोलताती. ॥ ९१ ॥
आम्हां इच्छा नसे तुमच्या द्रव्याची, । ऐकावी आमुची गोष्टी तुम्हीं ॥ ९२ ॥
पुरातन स्थळ आमुचें पंढरपूर, । मोडून महाद्वार मशीद केली. ॥ ९३ ॥
मोडून मशीद देऊळ स्थापावें, । पहिलें होतें बरवें जैसें तैसें. ॥ ९४ ॥
ऐसें करावें पत्रासि लेखन. । देऊनियां आज्ञा लेखकासि. ॥ ९५ ॥
ऐकूनियां राजा बोलावी लेखका. । कोऱ्या पत्रीं देखा मुद्रा केली. ॥ ९६ ॥
ह्मणे, 'पत्र लिहा, जैशी यांची आज्ञा; । दिलीसे राजाज्ञा हेचि तुम्हां'. ॥ ९७ ॥
घेऊनि राजाज्ञा, पत्र सिद्ध केलें. । पत्रांत लिहिलें शपथेसि. ॥ ९८ ॥
पुढें कोणी यवन येऊनि पंढरी, । उपद्रव न करी, ऐसें केलें. ॥ ९९ ॥
घेऊनि पत्र राजाज्ञा घेतली. । कांहीं कळा केली, अकळ ते. ॥ १०० ॥
बेलदार सात शतें सवें घेती, । विभूति लाविती सर्वांप्रति. ॥ १ ॥
विहंगमगति साधूनि चालिले, । पंढरी पावले माध्यान्हकाळीं. ॥ २ ॥
मोडूनि मशीद केलें महाद्वार. । चांगावटेश्वर बोलताती. ॥ ३ ॥
'आज व्रत असे, कार्तिकी दशमी, । मूर्ति सिंहासनीं स्थापावया. ॥ ४ ॥
ऐकूनि ब्राह्मणवचन वंदिती, । मूर्ति स्थापिताती चांगदेव. ॥ ५ ॥
दशमीं स्थापन केलें चांगयानें. । एकादशी दिन उगवला. ॥ ६ ॥
पांडुरंगें आज्ञा दिली चांगयासि, । कार्तिकी यात्रेसि दिलें तुह्मां. ॥ ७ ॥
कीर्तन करावें तुम्हीं एकादशी; । करावी द्वादशी अन्नशांति. ॥ ८ ॥
चांगदेवें ऐशा वरासि घेतलें, । शिष्य बोलाविले उभयतां. ॥ ९ ॥
आपण आसनीं स्वस्थ बसताती, । कीर्तन करिती निरंतर ॥ ११० ॥
भातलवंडे करिती बरवी अन्नशांति, । ऐशी हे पद्धति स्थापियेली ॥ ११ ॥
मरुद्गण गुरु, शिष्य उभयतां, । संगम स्थापितां त्रिवेणीचा. ॥ १२ ॥

स्वर्गी मरुद्गण, तोचि भागीरथी; । कीर्तनीं सरस्वती निरंतर; ॥ १३ ॥
भातलवंडे, यमुना, करिती अन्नशांति; । ऐशी ही पद्धति त्रिवेणीची ॥ १४ ॥
राउळाची पोंवळी सर्व करूनियां सिद्ध, । केलीसे प्रसिद्ध कार्तिकी. ॥ १५ ॥
कार्तिकी पौर्णिमा केली पंढरीसि; । मग समाधीसि पुसती आज्ञा. ॥ १६ ॥
मस्तक ठेविला विठ्ठलचरणीं, । सजळ नयन स्त्रवताती. ॥ १७ ॥
शरीरीं रोमांच, कंठ सद्गदित, । देखूनि पंढरिनाथ बोलियेले. ॥ १८ ॥
'ऐक चांगदेवा माझिया वचना, । होय सर्व जनां उपकार. ॥ १९ ॥
षडाक्षरी विद्येचा न करावा लोप; । बहुत साक्षेप ईचा करीं. ॥ १२० ॥
पुत्रासि उपदेश करीं परंपरा; । ते परोपकार्या करितील. ॥ २१ ॥
मृत्युसंजीवन नोहे याउपरी. । संबंध दुरित्वाचे हस्तें. ॥ २२ ॥
मंत्राचे पुरश्चरणें करावी विभूति; । लावितां प्रचिती सत्य घडे.' ॥ २३ ॥
दुसरें वरदान तूं ऐक माझें, । जेणें होय चित्त स्वस्थ. ॥ २४ ॥
'आषाढ मासींची शुद्ध एकादशी । तुझे समाधीस वंदीन मी. ॥ २५ ॥
पुण्यस्तंभीं महिमा घडे पंढरीचा; । बोलतों त्रिवाचा; भाक माझी. ॥ २६ ॥
दिंडी दशमीसि, कीर्तन एकादशी, । खिरापत द्वादशी करीन तेथें'. ॥ २७ ॥
ऐसें वरदान दिधलें तुजशीं, । आपुले स्थळासि जावें आतां. ॥ २८ ॥
ऐसा निरोप देवाचा घेतला; । रुक्मिणीस केला नमस्कार; ॥ २९ ॥
राधा सत्यभामा समस्तां वंदिलें; । राउळांतूनि आले चंद्रभागे. ॥ १३० ॥
चंद्रभागे आणि पुंडलिका नमिलें, । सकळ संतां केलें दंडवत; ॥ ३१ ॥
घेऊनि क्षेत्रा सव्य, तेथूनि चालिले, । बोळवीत आले पंढरिराव. ॥ ३२ ॥
उतरूनि भीमा उत्तरतीरा आले, । पांडुरंग गेले राऊळांत. ॥ ३३ ॥
आले चांगदेव आपुल्या स्वस्थाना, । विठ्ठलवरदाना घेऊनियां. ॥ ३४ ॥
लाधलेती वरा आषाढी, कार्तिकी; । येऊनि सर्वांसि भेटलेती. ॥ ३५ ॥
ज्येष्ठ पुत्रा केला अनुग्रह मंत्राचा, । हवाला कनिष्ठाचा दिधला त्यासि ॥ ३६ ॥
'पुढें तुम्ही यासि करा उपदेश, । सर्व पद्धतीस सांगूनियां. ॥ ३७ ॥
पांडुरंगचरणीं ठेवा दृढ भाव, । चालवील सर्व विठ्ठल हा. ॥ ३८ ॥
केशवराजाची सेवा ही करणें, । देव तो जाणणें आपुले वंशीं.' ॥ ३९ ॥
ऐसें व्रत पुत्रासि सांगूनि, । मुहूर्त समाधीसि विचारिले. ॥ १४० ॥
**शके बाराशें(१२००)असती सत्तावीस, । संवत्सरनाम क्रोधन** असे ॥ ४१ ॥
**ज्येष्ठ शुद्ध सप्तमी, रविवार असे, । नक्षत्र पुष्य, योग सिद्धि** असे, ॥ ४२ ॥

भानुसप्तमीचें पर्व थोर असे, । चालिले समाधीसि ग्रामांतूनि. ॥ ४३ ॥
केशवराजासि केला नमस्कार; । समारंभ सर्व संगें घेती. ॥ ४४ ॥
दिंडी, पताका, मृदंग, टाळ, विणे; । करित कीर्तन चालिलेती. ॥ ४५ ॥
वाजताति वाद्यें, होतसे गजर, । समारंभें थोर चालिलेती. ॥ ४६ ॥
याज्ञिक, वैदिक, अग्निहोत्री, पंडित, । कीर्तन करिती हरिदास. ॥ ४७ ॥
सर्वही मंडळीसहित निघती, । ग्रामांतूनि जाती सोमतीर्था. ॥ ४८ ॥
नमूनि सोमनाथा, गौतमी नमिली; । दंडवत केलें सर्वजनां. ॥ ४९ ॥
देखूनि सर्वांनीं नमिलें चांगदेवा. । म्हणती, 'असों द्यावा लोभ आतां'.॥१५०॥
अश्वत्थातळवटीं पद्मासन घातलें, । चांगदेवें केलें प्राणायाम. ॥ ५१ ॥
पांडुरंगमूर्ति आणूनि ध्यानासि, । आत्मा ब्रह्मांडासि नेते झाले. ॥ ५२ ॥
लागलीसे टाळी, झाले समाधिस्थ. । विठ्ठलनामाचा घोष करिती सर्व. ॥५३॥
चांगावटेश्वर झाले समाधिस्त, । जगीं हे विख्यात कीर्ति झाली. ॥ ५४ ॥
नित्योत्सव आणि दिंडी, जागरण, । पुराणपठण होत असे. ॥ ५५ ॥
आषाढीची यात्रा भरे प्रतिवर्षी, । जैसा पंढरीसि समारंभ. ॥ ५६ ॥
समाधि घेतल्या झालीं वर्षें बारा. । समाचार बरवा पुढें ऐका. ॥ ५७ ॥
चांगयाचा पुत्र कनिष्ठ विठ्ठल असे, । विनवी बंधूसि ते काळीं. ॥ ५८ ॥
उपदेश सांगा विद्या षडाक्षरी, । पद्धति बरवी दाखवावी. ॥ ५९ ॥
ऐकूनियां वचन कनिष्ठाचें. । बोलतसे वाचे प्रत्युत्तर. ॥ १६० ॥
नाहीं स्नानसंध्या; सत्कर्म करणें; । उपदेश जाण न करीं मी. ॥ ६१ ॥
बहुत छळणा केली विठ्ठलाची; । उदासीन त्याची वृत्ति झाली. ॥ ६२ ॥
सर्वही त्यजूनि बैसलासे स्वस्थ, । जेथें समाधीस तीर्थरूप. ॥ ६३ ॥
ऐसें तीन रात्र केलेंसे निदान, । तंव त्यासि दर्शन झालें तेथें. ॥ ६४ ॥
चांगदेव उभे; हातीं वेत, कुंचा. । 'तुझिये मनीचा हेत सांग.' ॥ ६५ ॥
देखूनियां केलें साष्टांग नमन. । 'उपदेश करणें' म्हणे 'मज. ॥ ६६ ॥
ग्रामांत येऊनि उपदेश करणें, । पुनरपि होणें समाधिस्त.' ॥ ६७ ॥
'अवश्य,' ह्मणूनि बोलिले स्वामी. । सूर्योदयीं दशमी दुसरे दिवशीं. ॥ ६८ ॥
दिंडी घेऊनियां गेले देउळासि, । तंव चांगयासि देखियेलें. ॥ ६९ ॥
बारा वरुषां झालें पुन्हां दर्शन. । करिती नमन सर्व लोक. ॥ १७० ॥
दिंडीसमागमें आलेती गृहासि, । अनुग्रह विठ्ठलासि केला तेहीं. ॥ ७१ ॥
ज्येष्ठ पुत्रावरि बहुत क्रोध केला. । ह्मणती, 'बाळकाला छळियेलें. ॥ ७२ ॥

सुवर्ण नगरी भूमंडळीं । करूनि अर्पिली तत्काळीं । ऐसा वनमाळी तुष्टला ॥ १२० ॥ आतां सोडूनि शोक चिंता । भावें भजावें भगवंता; । दरिद्र पळालें तत्वतां । दूरि दिगंताबाहेरी. ॥ २१ ॥ नानाउपभोग संपत्ति । वेचितां न सरे कल्पांतीं । ऐसें देऊनि तुम्हांप्रती । रमापती तुष्टला. ॥ २२ ॥ ऐकोनि स्त्रियेचे शब्द । ब्राह्मणासि ब्रह्मानंद । नाहींच झाला विषादखेद । भेदाभेद गळाले. ॥ २३ ॥ वदनेंदु षोडशकळीं । पूर्णपौर्णिमा नभमंडळीं । तेज फांकले स्वानंदमेळीं । सुखकल्लोळीं मन विरे. ॥२४॥ मग नेऊनि पर्यंकावरि । सुमन शेज आरु वरी। बैसविला आदरें करीं । धरुनि अंतरीं समवेत. ॥ २५ ॥ नगर नागरिक लोक। दर्शना पातले एक एक। नमस्कारिती सकळिक । सेवेसि सेवक तिष्ठती. ॥ २६ ॥ वस्त्राभरणें अलंकार । उपायनें नानाप्रकार । घेऊनि येती जे जे नर । ते तें सत्वर धांवती. ॥ २७ ॥ सोडूनि सराफ लक्षापती । अष्टादश पगड याती । एकापुढें एक धांवती, ॥ धन्य म्हणती प्रारब्ध. ॥ २८ ॥ नगरीचा स्वामी नगरा । आला पाहूं, करा त्वरा, । एक म्हणती दाटी वारा । लोक सारा परौते. ॥ २९ ॥ दीप जाळूनि सुवर्णताटीं । नगर नारी येती भेटी; । सुदामदेव पाहतां पेटीं । आनंदकोटी होतसे, ॥ १३० ॥ अखंडदंडायमान । ऐसा सोहळा अनुदिन । लक्ष्मीवंत समसमान । सर्वही जन सारिखे ॥ ३१ ॥ असो ऐसा श्रीहरी । भक्तकाज कैवारी । सुदामया सुवर्णनगरी । क्षणामाझारीं दीधली. ॥३२॥ वर्णितां सुदामचरित्र । पावन होय वक्त्र । श्रवण करितां श्रोत्र । अतिपवित्र सर्वदा. ॥ ३३ ॥ सुदामदेवाची कथा । आगेती जे वाकंथा । ते प्रिय होती कृष्णनाथा । सुदामदेवासारिखे ॥ ३४ ॥ सुदामदेवयाचें आख्यान । पढतां निजानंद घन । पूर्ण रंगीं रंगोन । ब्रह्मसंपन्न करील. ॥ ३५ ॥ भारतसमुद्र वेदव्यासें । मथिला होता चिद्विलासें । तेथील रत्न हें प्रयासें । दासानुदासें घेतलें ॥ १३६ ॥

॥ रंगनाथकृत सुदामचरित्र संपूर्ण ॥

---

## शुकरंभासंवाद.

### ओंव्या.

जयजया गिरिजात्मजा । अनन्यभावें तुझी पूजा । करूनियां आत्मकाजा । शरण वोजा रिघालों. ॥ १ ॥ ॐ नमो वाग्विलासिनी । वीणा, पुस्तकधारिणी । जिव्हे नवरसदायिनी । होई जननिये जगदंबे ॥ २ ॥ महानुभाव विद्वज्जन । तयांसि करूनियां नमन, । गुरु परब्रह्म परिपूर्ण । सच्चित्सुवर्ण, जग नग, ॥ ३ ॥ अभिवंदिला तो स्वामी, । जो निजानंदधामीं । रंगला

अनामनामीं । विराजे कर्मीं निष्कर्म. ॥ ४ ॥ स्तवन करितां आर्जव जनें । संतोषोनि प्रशस्त मनें । शारदा गुरु गजाननें । सुप्रसन्न बोलिजे. ॥ ५ ॥ स्फूर्ति पावोनि प्रसादें. । कथाकौतुक विनोदें । वर्णाक्षरीं विचित्र पदें । पैल तीं द्वंद्वें प्रमेयासि. ॥ ६ ॥ कोणे एके दिवशीं । नारद आला इंद्रसभेसि, । कलिकालाचें गमन त्यासि । वृत्तांतासि जाणत. ॥ ७ ॥ इंद्र पुसे मुनिवर्या । कांहीं सांगावें आश्चर्या, । कोण करितो तपश्चर्या । अपर सूर्यासारिखा ? ॥ ८ ॥ मृत्युलोकीं तपोनिधि । कवण आहे, सांगा, सुधी. । नारद म्हणे रे महोदधि । तुज बुद्धि स्फुरेना. ॥ ९ ॥ राहूं नको निजसुरा, । नेणसी शुकयोगींद्रा । सिद्ध-वर्नी त्यासि थारा । जगदोद्धारा अवतरला. ॥ १० ॥ अमानित्वादि दैवी- । संपत्तींचा गोसांवी । मुक्त-मौक्तिक अनुभवी । चिदार्णवीं जन्मला. ॥ ११ ॥ देहादि भुवनत्रय । जाणोनियां तृणप्राय । स्वरूपान्वयें निर्भय । वर्णूं काय तयासि ? ॥ १२ ॥ शापानुग्रहसमर्थ । कदाचित् धरिला स्वार्थ । तुझिया पदासि अनर्थ । जाणें यथार्थ बोढवला. ॥ १३ ॥ ऐसी लावूनियां कळी । गमन केलें तयेकाळीं, । या उपरि इंद्र शोकजाळीं । पडला मेळीं चिंतेच्या. ॥ १४ ॥ तेचि रसाळ कथा गहन । श्रोतीं होऊनि सावधान । सर्वांगाचें श्रवण । द्यावें अवधान ग्रंथासि. ॥ १५ ॥ शुक योगींद्राचें तप । झालें झालें जाणोनि अमूप, । अमरनाथ विक्षेप । सचिंतरूप सर्वदा. ॥ १६ ॥ वेदशास्त्रसंपन्न । सभेसि आलिया ब्राह्मण, । अल्पज्ञाचें दुश्चित मन । तैसें जाण इंद्रासि ॥ १७ ॥ शतमख सांग घडे ज्यासी । इंद्र-पद प्राप्त त्यासि, । ऐशा पुण्याच्या राशी । शुकापशीं जाणवल्या. ॥ १८ ॥ स्वसामर्थ्यें माझें स्थळ । घेईल लागतां वेळ, । विघ्न करावें प्रबळ । सुनिश्चळ होऊनि. ॥ १९ ॥ मग विचारूनि मानसीं । पाचारियलें रंभेसि, । छळावया श्रीशुकासि । तत्क्षणीं योजिली. ॥ २० ॥ अति सुंदर लावण्यगुणें । दिव्य अलंकार भूषणें । सुगंधद्रव्यें वस्त्राभरणें । बाळसूर्यासादृश्य, ॥ २१ ॥ नेत्रकटाक्षबाणें । हृदय भेदी जीवें प्राणें, । पंचविषयांचें धांवणें । निघे दर्शनें जियेच्या. ॥ २२ ॥ ऐसी रंभा स्वरूपें सुंदर । पाठविली सत्वर । देवोनि उपकरण सामग्री समग्र । योगेश्वर छळावया. ॥ २३ ॥ मग मनोवेगें चालिली । जैसी विद्युत्प्रभा झळकली, । विडा पैजेचा उचलोनि गेली, । आज्ञापिली ते समयीं. ॥ २४ ॥ श्रीशुकाचा तपप्रभाव । वना दशा आली अपूर्व, । कल्पलता वृक्ष सर्व । हें अपूर्व वर्तलें. ॥ २५ ॥ ते काननींच

सरोवर । अमृताहूनि गोड नीर, । पक्षिगायनें किन्नर । देहभाव विसरले. ॥२६॥ अचळ राहिला वसंत, । तेणें सकळ वृक्ष जात । सिद्धचारण मुनी तेथ । अंतर्भुवनीं विश्रामिले. ॥ २७ ॥ कीटक, पक्षी, जळचर, । चतुष्पादादि वनचर, । कोण्ही नाहीं क्षुधातुर, । तृषारहित. ॥ २८ ॥ जीवमात्रांसि तारुण्य । शोभे यापरी अरण्य, । महिमा शुकाची अगण्य । अपार पुण्य तपाचें. ॥ २९ ॥ तेथिंचे विचित्र पाषाण. । वैडूर्यतेजसंकीर्ण, । प्रकाश शशी-सूर्येवीण, । अणुप्रमाण तम नाहीं, ॥ ३० ॥ नक्षत्रांमाजी सोम, । दशांव-तारीं कृष्णराम, । अपरसूर्य पूर्णकाम, । विश्रामधाम साधकां. ॥ ३१ ॥ ऐशि-या श्रीशुकापाशीं । रंभा आली छळावयासि, । तेथिंची विचित्र चर्या कैसी । अभिप्रायेंसि परियसा. ॥ ३२ ॥ आली शुकाचिया गुंफेसि, । तंव तो ध्यानस्थ मानसीं, । ऋद्धि वोळंगती दासी । चरणापाशीं जयाच्या. ॥ ३३ ॥ अखंड स्वरूपाकार दृष्टि, । ब्रह्मरूप देखे सृष्टि, । पाहतां परमामृतवृष्टि, । होय पुष्टि जीवांसि. ॥ ३४ ॥ सच्चिदानंद तनु । जैसा दिसे बाळ जानु । निजतेजें शोभायमानु । मनमोहन साधकां ॥ ३५ ॥ निर्विकार मनोवृत्ति, । देहीं विदेही आत्मस्थिति, । अभंग भंगेना कल्पांतीं, । ऐसी मूर्ति देखूनि. ॥ ३६ ॥ कला, कौशल्य, गीत, नृत्य, । संगीतगायनें रमवीं चित्त, । हास्यविनोदें रंजवीत । परि तो मुक्त यदर्थी. ॥ ३७ ॥ नाना वाद्यांचे गजर । परम रमणीय मनोहर, । नूपुरांचे झणत्कार । कर्णद्वारीं प्रवेशती. ॥ ३८ ॥ शब्द पडतां श्रवणीं, । शुक सावध जाहला मनीं, । काय कौतुक या वनीं ? । म्हणूनि नयनीं विलोकिलें. ॥ ३९ ॥ इंदुवदना सुलोचनी । रंभा देखिली नयनीं, । स्त्रीपुरुषभाव कानीं । शुक स्वप्नीं नायके. ॥ ४० ॥ मुकुट, कुंडलें, कुसरी, । तिन्हीं नामें अलंकारीं, । सुवर्ण एक चराचरीं । तैशापरी जग देखे. ॥ ४१ ॥ संकल्प, सन्निपात भेद । जल्पती ते मतिमंद, । अकल्प बोधें तत्वविद । बोधले स्वपद पावूनि. ॥ ९२ ॥ ऐसें जाणूनि येरीं । पूजन केलें षोडशोपचारीं, । अमृत नैवेद्य वोगरीं, । उदक सारीं प्राशना. ॥ ४३ ॥ प्रतिमा पाषाण जैसा, । मुनी पूजा घे तसा, । तेथ कायसी विषयाची आशा । प्राप्त पुरुषा बोलणें. ॥ ४४ ॥ स्वसुखासनारूढ जाण । तो कां करी वृषभारोहण? । नित्य तृप्त भिक्षाटण । करी कवण विचारें ? ॥ ४५ ॥ मळ, मूत्रवायस भक्षी, । हंस तयातें न लक्षी, । पाहतां दोघे पक्षी । सज्ञान दृष्टीं जाणती. ॥ ४६ ॥ मुक्तमोतियांचा चारा । तयां राजहंसां सुकुमारां, । वास मानस

सरोवरा। रहित थारा न माने. ॥ ४७ ॥ तैशापरी या योगींद्रा। रंभा दावी काममुद्रा, । अवस्थातीत योगनिद्रा । चित्सुखभद्रा ते काळीं. ॥ ४८ ॥ ऐशा योगेश्वराप्रति । रंभा वदे कुश्चळ उक्ति, । नपुंसक होसी तूं ये जगतीं । पुरुष व्यक्ति होऊनि. ॥ ४९ ॥ आम्हां ऐशा नारी । धुंडितां दुर्लभ चराचरीं, । एकांतस्थळ त्याही- वरि । वनांतरीं असोनि; ॥ ५० ॥ सौंदर्य आमुचें विचित्र, । ध्यान केला विश्वामित्र, । न साहे वियोग क्षणमात्र, । त्याहूनि अन्यत्र योग्य कोण ? ॥ ५१ ॥ आमुचे नेत्रकटाक्ष । वारी ऐसा कोण दक्ष ? । इंद्र जाहला साक्षेप । हें प्रत्यक्ष सर्वांसि. ॥ ५२ ॥ मृत्युलोकींचे राय । मानूनि जैसे तृणप्राय, । गणना इतरांची काय ? । कोणीही न जाय जिंकोनी ॥ ५३ ॥ जन्मा आलिया पुरुषें । भोग भोगावे सावकाशें, । इंद्रियें कोंडितां आक्रोशें । महादोषें आकळिजे. ॥ ५४ ॥ ईश्वरें निर्मिलीं इंद्रियें, । त्यांहीं करावीं आपलीं कार्यें । न करितां प्रत्यवायें । द्रोही निश्चयें होशील. ॥ ५५ ॥ ऐसी मदोन्मत्त प्रमादें । वचन बोलताहे विनोदें, । शुक निर्भय स्वच्छंदें । अति आल्हादें बोलत. ॥ ५६ ॥ रंभे तूं प्रत्यक्ष मोहिनी, । सकळ कळा प्रवीण गुणीं, । अंकुर इच्छिसी पाषाणीं । घालूनि पाणी सर्वदा. ॥ ५७ ॥ भस्मीं घृताचिया धारा, । घातलिया काष्ठभारा, । पेटणें नाहीं वैश्वानरा, । भ्रम वोसरा तेवीं तुझा. ॥ ५८ ॥ रंभे तुझे उपाय । निष्फल झाले, सांगूं काय, । इंद्रजाळींचे राय– । छाये अंगें मारिसी. ॥ ५९ ॥ ऐसें बोलतां योगेश्वरें । रंभा वदे प्रत्योत्तरें, । तूं क्लैब्य होसी निर्धारें । हें मज बरवें कळों आलें. ॥ ६० ॥ तुझिया मनींचा भाव । मज कळों आला सर्व, । हाही मनुष्यलोकींचा जीव । काय अपूर्व मानावा ? ॥ ६१ ॥ ऐसें भाविशील झणीं । नहों मृत्युलोकींच्या कामिनी, । मळमूत्रें पैं घणी । भरिल्या सौंधणी रजकाच्या ॥ ६२ ॥ दंतधावन, मुखशुद्धि, । न करितां, ये दुर्गंधि, । कफ, वात, पित्तें, कवीं । सांपडल्या त्रिशुद्धि नवजाती. ॥ ६३ ॥ ऐशा नव्हों आम्ही नारी, । स्वर्गलोकींच्या सुंदरी । म्हणोनि आवेशें नखाग्रीं । उदर चिरी तात्काळ. ॥ ६४ ॥ दोन्हीं करें दोन्ही भाग । करोनि दावी अंतरंग, । नानापरिमळ भोग । सुवासें चांग नभभरें. ॥ ६५ ॥ बावन्न चंदन अपर, । जवादि कस्तूरी अगर, । विचित्र परिमळ कापूर, । सुगंध अपार निघाले. ॥ ६६ ॥ जाई, जुई, शेंवती, । मोगरे, चंपक,

मालती, । बकुल पुष्पें, केगती, । ऐसे येती सुवास. ॥ ६७ ॥ रंभा बोले श्रीशुकातें । अविश्वास असेल तूतें, । तरि येऊनि स्वहस्तें । पाहें मागुता एकदां. ॥ ६८ ॥ शुक ह्मणे विदित झालें, । पूर्वी असतें जरि कळलें । तुझिये पोटीं नाहीं केलें । जन्म घेणें ईश्वरें. ॥ ६९ ॥ बारा वर्षें उदर-कुहरीं । श्रमलों मातेच्या उदरीं, । मळमूत्र नवद्वारीं । नरकघोरीं न पचतों. ॥ ७० ॥ ऐसें बोलतां शुकमुनी, । अनुतापें तापली मनीं, । मग प्रवर्तोनियां स्तवनीं । येऊनि चरणीं लागली. ॥ ७१ ॥ धन्य धन्य तुम्ही संत, । अखंड स्वरूपीं शांत, । तेथें कायसी हे मात । नित्य तृप्त तयांसि ? ॥ ७२ ॥ स्वामिसेवे-चेनि निमित्तें । पूर्वकर्म शुद्ध होतें । तरीच देखिलें चरणातें, । पूर्ण चित्तीं निवालें. ॥ ७३ ॥ ऐसें बोलोनि, आज्ञा । घेऊनि गेली स्वस्थाना, । पतन नोहे योगी-जनां । अधिष्ठाना पावलिया. ॥ ७४ ॥ शचीपति पुसे वृत्त, । रंभे सांग यथोचित, । तंव ते प्रेमें सद्गदित । हर्षयुक्त बोलत. ॥ ७५ ॥ सांगों काय, कळानिधि । शुकयोगींद्राची बुद्धि, । सदां निमग्न तो सुखाब्धीं, । माजी देहबुद्धि त्या नाहीं. ॥ ७६ ॥ आत्मलाभें नित्यतृप्त । लोकाचरणीं तो प्रसुप्त । त्याची दशा अति गुप्त । असे लुप्त योगियां. ॥ ७७ ॥ सदाशिवा छळिती भूतें, । क्षुधेतें पीडिलें अमृतें, । तरिच छळणोक्ति श्रीशु-कातें । निश्चयातें पावेल. ॥ ७८ ॥ वागुरें आंतुडे वारा, । शीतें पीडिजे हिमकरा, । तमें दाटिजे भास्करा, । तैं शुक योगींद्रा छळणोक्ति. ॥ ७९ ॥ पतंगाचेनि पक्षवातें । शांत कीजे प्रळयाग्नीतें, । जंबूकभयें पंचाननातें । सुख-निद्रा न लागेचि. ॥ ८० ॥ चित्रींचे छाया-कृष्णसर्पें । गरुड भयाभीत कीजे दर्पें, । तरिच श्रीशुकातें कंदर्पें । विकलता दीजे देवेशा. ॥ ८१ ॥ भक्ति, विरक्ति आणि प्रबोध । शुकाचे ठायीं शुद्ध, । न कळे महिमा अगाध, । त्यासि बाध कवण लावी ? ॥ ८२ ॥ ऐकोनि रंभेचा वाग्विलास । साहितसुरगुरु देवेश, । धन्य बोलती श्रीशुकास, । मुक्त सर्वांसि मानला. ॥ ८३ ॥ सहजीं सहज पूर्णरंग, । निजानंद जो निःसंग, । सर्व संगीं तो अभंग, । ग्रंथ सांग पैं तेणें. ॥ ८४ ॥ समाप्त.

# पंचीकरण.

श्रीगुरुभ्यो नमः ॥ सद्गुरु म्हणती शिष्य शिरोमणि । सावध होऊनी अंतःकरणीं । देहचतुष्टय मांडणी । ऐके श्रवणीं सादर. ॥ १ ॥ शुद्ध परब्रह्म परिपूर्ण । सत्य ज्ञानानंदघन । तेथें अहंब्रह्म हें स्फुरण । उठिलें स्मरण धरोनि. ॥ २ ॥ तोचि ईश्वर ते शक्ति । जे जगदंबा मूलप्रकृति । जिचेनि अव्यक्त आलें । अमूर्त मूर्ती विस्तारली. ॥ ३ ॥ तीपासाव गुणक्षोभिणी । कन्या जन्मली सौंदर्यखाणी । पुत्र प्रसवली प्रतापतरणी । तत्क्षणीं तिन्ही गुण ॥ ४ ॥ ब्रह्मा रजोगुणी सृष्टिकर्ता । विष्णु सत्वगुणें प्रतिपाळिता । रुद्र तमोगुणें संहर्ता । त्रिगुण तत्वता जाणिजे .॥ ५ ॥ यापासूनि जाहलीं उत्पन्न, । महापंचभूतें जाणावा प्रथम, । स्थूळ देह निर्माण । करावया पूर्ण निर्मिलीं. ॥ ६ ॥ आकाश, वायू आणि तेज, । आप, पृथ्वि हें तूं बूज । या पांचांची पंचवीस सहज । तेही तुज सांगेन. ॥ ७ ॥ काम, क्रोध, शोक, मोह, भय, । हा आकाशाचा अंश निःसंशय । हें सत्वगुणाचें कार्य । असें आचार्य बोलती. ॥ ८ ॥ धावन, वळण, आकुंचन । प्रसरण आणि निरोधन । हें वायूचे पांचही गुण । तत्वता निपूण जाणती. ॥ ९ ॥ क्षुधा, तृषा, निद्रा, आलस्य, । मैथुन पांचवें परियस, । हे तेजाचे गुण विशेष । सांगणें तदंश म्हणवूनि. ॥ १० ॥ लाळ, मूत्र आणि शोणित, । मज्जा पांचवें रेत, । हे आपाचे गुण निश्चित । वेदार्थसंमत यदर्थी. ॥ ११ ॥ अस्थि, नाडी, त्वचा, रोम, । मांस, पृथ्वि हें पंचम । यांचा करूनि कर्दम । स्थूळ उत्तम निर्मिलें. ॥ १२ ॥ एवं तु या पंचविसांचा । साक्षी वेगळा साचा । मळ न लागे तुज याचा । सत्य त्रिवाचा जाणपां. ॥ १३ ॥ आतां या स्थूळ देहातें । लिंगदेह जें वागवितें । तें सांगों तुज निरुतें । सावध चित्तें ऐकणें. ॥ १४ ॥ पंचवीस कळा पंचवीस भूतें । तेथेंही असती समस्तें । सूक्ष्मरूपें निभ्रांतें । सांगों तूतें सविस्तर. ॥ १५ ॥ अंतःकरण आणि मन, । बुद्धि, चित्त, अहंकार पूर्ण, । हें आकाशपंचक जाण । अनुभवें खूण जाणवे. ॥ १६ ॥ व्यान, समान, उदान, । प्राण आणि अपान, । हें वायूपंचक स्थान । यासि अनुमान असेना. ॥ १७ ॥ श्रोत्र, त्वचा, नयन, । जिव्हा आणि घ्राण, । पांच ज्ञानेंद्रियें आपण । तेज पूर्ण जाणिजे. ॥ १८ ॥ वाचा, पाणी, पाद, । शिस्न आणि गुद, । हे आपाचे भेद विशद

जाणावे. ॥ १९ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, । हे पंचविषय विविध । पृथ्वीचे गुण प्रसिद्ध । ऐसें प्रबुद्ध जाणती. ॥ २० ॥ या पंचवीस कळा । यांचा साक्षी तूं निराळा । तुझी तुज न कळे लीळा । तुज निर्मळा मळ कैंचा? ॥ २१ ॥ हें नेणावया कारण । मुख्य अज्ञान आवरण । पडिलें तेणेंकरून । विस्मरण पूर्ण पूर्णत्वाचें. ॥ २२ ॥ तंतू म्हणे मी झालों पट । मृत्तिका ह्मणे मी झालें घट । स्वस्वरूप नेणोनि स्पष्ट । अहा कटकट वावुगी. ॥ २३ ॥ स्वस्वरूपाचें विस्मरण, । अन्यथा प्रपंच ज्ञान, । हें तिसरें देह कारण । ऐकलक्षण तयाचें; ॥ २४ ॥ स्थूळ सूक्ष्माचें मूळ । अज्ञान कारण केवळ, । नाना योगी प्रबळ । व्रेरूनि चंचळ फिरवीत; ॥ २५ ॥ जे जे देह वरीत । तेथेंचि तादात्म्य धरीत, । मी जीव हा भाव करीत । भरणा भरीत सुखदुःखाचा. ॥ २६ ॥ या तिहीं देहांचा साक्षी । अलिप्त जो सर्व पक्षीं । उत्पत्ति, स्थिति, लय लक्षी । जयासि सुदक्षीं तयीं प्रणिजे. ॥ २७ ॥ तत्वमसि विवेक । जेणें विवळ होय सम्यक । महाकारणदेह देख. । पुण्यश्लोक बोलती. ॥ २८ ॥ ज्याचिया सत्ते विश्व चळे, । ज्याचिया सत्ते सर्व कळे, । दशदिशा त्रैलोक्य उजळे, । उघडती डोळे आत्मदर्शनीं. ॥ २९ ॥ हें पंचीकृत पंचीकरण । चहूं देहांचें विवरण, । याचा साक्षी तूं आपण । नित्य निर्गुण स्वसंवेद्य. ॥ ३० ॥ या चहूं देहातीत । तूं निःसंग निर्विशेष अलिप्त । शुद्ध, बुद्ध, नित्य, मुक्त । सत्य, शाश्वत परब्रह्म. ॥ ३१ ॥ दिनरजनी सायंप्रातः । जैसा नेणोनि भास्वत् । रश्मीयोगें मृगजळ भासत । होत जात तें नेणें. ॥ ३२ ॥ तैसें तुजवरि हें भान । मिथ्या विवर्त उपादान । तूं चिन्मात्रैक चैतन्यघन । कैंचें स्वप्न जागृति? ॥ ३३ ॥ वर्णव्यक्ति नामरूपातीत । अज, अव्यय, सदोदित । तूं स्वयंप्रकाशघन संतत । मूर्तिमंत परब्रह्म तूं. ॥ ३४ ॥ सहजीं सहज पूर्णरंग । निजानंद अभंग । निष्कळंक निःसंग । द्वैताचा पांग तुज नाहीं ॥ ३५ ॥ संपूर्ण ॥

---

## ॥ मिथ्या माया स्वरूप ॥

### ओंव्या.

मिथ्या मायेचें स्वरूप । सांगो जातां शब्द सोप । नाहींच त्याचा प्रताप । वर्णितां संताप मानसीं. ॥ १ ॥ गंधर्वनगरींचा भूपति । पुरुषार्थें विख्यात

त्रिजगतीं। भीष्मकन्या तयाप्रति। नोवरी निश्चिति नेमिली. ॥ २ ॥ लग्न लागलें वाडें कोडें। सामग्री सिद्ध निज निवाडें। मृगजळाचें घातले सडे। कोल्हेरी-घोडे पालाणिले. ॥ ३ ॥ चित्रतरूची शीतळ छाया। खपुष्पगंधें हर्षे राया। वंध्यापुत्र मंत्री तया। नाना उपचार जाणविती. ॥ ४ ॥ वारयाच्या वळूनि वाती। भिजविल्या कूर्माच्या घृतीं। खद्योत-तेजाच्या दीप्ति। प्रकाश दिगंतीं न समाय. ॥ ५ ॥ रज्जुसर्पाच्या श्रवणीं। घोष पडतां वाद्यध्वनि। दर्पणांच्या अमूप धनी। ब्राह्मण भूरिदानीं कुबेर झाले. ॥ ६ ॥ इंद्रजाळींचे राय। गौरविले सहसमुदाय। अजन्म्याची माय। विहीण स्वप्नीं मिरवत ॥ ७ ॥ ऊर्णनाभीचें वस्त्रसंभार,। वोडंबरीचे अलंकार,। अश्वशृंगाचे करभार। देऊनी नृपवर गौरविला. ॥ ८ ॥ नपुंसकाचे पुत्र। चिरूदें वर्णिती विचित्र। सत्य नसतां ब्रह्मसूत्र। लग्न ऐसें लागलें. ॥ ९ ॥ अमूप सामग्री वेंचिती। दिवसा अंधार जोखिती। आंधळे पाहोनि देती। वोटि घेती स्वहस्तें. ॥ १० ॥ पांगुळ नटत्वें नाचती। मुके गायनें गाती। बधिर श्रोते ऐकती। बोहला शोभती नोव्हरे ते. ॥ ११ ॥ अश्वत्थपुष्पचूर्ण। माजी नभनीळिमा संपूर्ण। एकत्र करितां पतिवर्ण। वस्त्रें शोभले वऱ्हाडी. ॥ १२ ॥ पिळूनि मोतियांचें पाणी। वरी शिंपिती वऱ्हाडिणी। दिगांबर वधुवरां भरणी। लग्नमंडपीं मिरवती. ॥ १३ ॥ मिथ्या माया यापरी। रूपक करतां कवेश्वरीं। व्यर्थ शिणवावी वैखरी। उदकमथन वावुगें. ॥ १४ ॥ घाणा घालूनि वाळू। निरर्थक काय गाळूं। अजागळस्तन पिळूं। आकाश कवळूं कांसया. ॥ १५ ॥ करितां सारासारविचार। विष्णुनामस्मरण सार। सद्गुरुभजन निरंतर। वाचे उच्चार श्रीराम ॥ १६ ॥ विश्रांतीचें जन्मस्थान। सतरावियेचें स्तनपान। करूनियां सहज पूर्ण। निजानंद रंगावे. ॥ १७ ॥

संपूर्णमस्तु।

---

## ॥ श्रीएकाखडी–ओंव्या ॥

करितां सारासारविवेक। कर्माचें कर्म मोचक,।
काम्य निषेध रहित एक। निष्काम उत्तमश्लोक आचरती. ॥ १
खरें पारखूनि घेतां लेख। खर्चूं जातां परम सुख।
खोटें लागतां वाटे दुःख। पिशुन देख हांसती. ॥ २
गर्विष्ठांचें कर्म सांग। गजांत लक्ष्मी परि मातंग।

304749

गर्भांधवनितेचा चांगभाग । न देखे निजांग आपुलें ॥ ३

घंटाघोषें निष्काम ओघ । घडघडां वाहती अनघ ।
घन पावावया सिंधूचें सैंघ । धांवती अमोघ चपळत्वें ॥ ४

न धरूनि कर्माभिमान । नारायणार्पणविधिविधान ।
नरवैडुर्यें करितां पावन । ब्रह्मसनातन पाविजे ॥ ५

चकोरांचा खर्चवेंच । चंद्रामृताचि साच ।
चंदन सर्वांगें फळतोच । हो कां उंच नीच भलतैसा ॥ ६

सत्रींचें अन्न उदक स्वच्छ । छेदी सुकृतहंसाचें पिच्छ ।
छलना करी तया साधु तुच्छ । मानिती जेंवि मत्स्य मद्यातें ॥ ७

जया काम्यकर्मांचें बीज । जन्ममृत्यूचें नाचवी भोज ।
जनीं जनार्दन भावी तो सहज । सायुज्यशेज तयासि ॥ ८

झकवेना तो कैसा बुझे । झडोनि गेलिया माझें ।
झडपितां महद्भूतें ओझें । उतरलें द्वैतबुद्धीचें ॥ ९

यानंतर कर्ता कार्य क्रिया । या त्रिपुटी गेलिया विलया ।
यामार्धे लव पळ नवचे वांयां । ब्रह्मसमन्वयावांचूनि ॥ १०

टाकूनि जगद्भानपट । टाळी पिटिली समसकट ।
टवाळ जाणोनि सेवट । देखती एक चित्तंतु ॥ ११

ठक पडलें वेदासि उत्कट । ठसावलें हृदयीं वैकुंठपीठ ।
ठायिंच्या ठायीं निराकारमठ । बोलतां ओंठ उमलेना ॥ १२

डाव साधला प्रचंड । डळमळीना पडतां ब्रह्मांड ।
डंवरला चित्तें जैसा मार्तंड । अखंड दंडायमान तो ॥ १३

ढाल निजविजयाची गूढ । ढळेना उभी केली दृढ ।
ढेंकर देऊनि स्वसुखासनारूढ । झाला प्रौढ स्वानंदें ॥ १४

नभ सर्वी सर्वत्र व्यापून । न मिळे अलिप्त समसमान ।
नलिनीपत्रावरि जीवन । असतां अभिन्न त्यामाजी ॥ १५

तैसा कर्मी वर्तत । तया बोलिजे जीवनमुक्त ।
तक्रामाजी जैसें नवनीत ॥ घातलिया होत वेगळें ॥ १६

थापटूनि सद्गुरुनाथ । थडिये पाववितो समर्थ ।
थोर अर्थ स्वार्थ परमार्थ । देऊनि अनर्थ चुकवितो ॥ १७
दयार्णव तो ज्ञानप्रद । दवडूनि माया मोह मद ।
दश दिशा ब्रह्मानंद । करितो भाग्यमंदासि ॥ १८
धन्वंतारि सद्गुरु प्रसिद्ध । धांवे घेऊनि दिव्यौषध ।
धगधगीत शुद्ध बुद्ध । पूर्ण बोध पूर्ण मात्रा ॥ १९
न कळे करितां साधन । न कळे धरितां मौन ।
न कळे करितां निरोधन । तें अवलोकनमात्रें आंकळे ॥ २०
पढतां वेदशास्त्र जप । पर्वतीं बैसोनि करितां तप ।
परंतु न कळे **निजरंग**स्वरूप । तें सद्गुरु आपेंआप दाखवी ॥ २१

---

## १०. बद्धमोक्षविवरण.

ॐ नमोजी स्वामी श्रीगुरुवर्या, सच्चित्सुखसूर्या । भवतमनाशक तूं क्षणमात्रें, तुझी अगाधचर्या ॥ १ ॥ प्रबोध बाणलिया चित्ता, तुझी सर्वही सत्ता । परब्रह्म मूर्तिमंत तूं, श्रीगुरुदेवदत्ता ॥ २ ॥ तुझिया स्वरूपाचें वर्णन, वर्णितां परिच्छिन्न । वेदश्रुती धरियेलें मौन, म्हणतां 'तन्न तन्न' ॥ ३ ॥ ऐसा निर्विकल्प कल्पतरु, माझा सद्गुरु । श्रीरंग निजमूर्ति उदारु, पूर्ण परात्परु ॥ ४ ॥ देशिक सर्वज्ञ दयाळ, भक्तवत्सल । अनन्य शरणागत प्रतिपाळ, कर्ता केवळ ॥ ५ ॥ सच्छिष्य साधनसंपन्न, शरण अनन्य । त्राहें त्राहें म्हणवून, बोले वचन ॥ ६ ॥ म्हणे देवा करुणानिधाना, आनंदघना । संशय झाला तो या मना, फेडी जगजीवना ॥ ७ ॥ बद्धमोक्ष म्हणती तें काय, कैसा अभिप्राय । श्रवणें होईल प्रत्यय, सत्य सुनिश्चय ॥ ८ ॥ छेदावा जी माझा संशय, म्हणूनि धरिले पाय । कृपेनें तो बोलला गुरुराय, तोचि तरणोपाय ॥ ९ ॥ गुरु म्हणती शिष्य सुमति, बद्धमोक्ष हे भ्रांति । उदय अस्तु नेणें गभस्ति, सिद्ध स्वयंज्योति ॥ १० ॥ आपुली कल्पना निश्चयें, बद्धता तें स्वयें । लोंबतसे धरूनियां पायें, शुकनलिकान्यायें ॥ ११ ॥ अहं देही ऐसें जें भान, तेंचि अज्ञान । अज्ञानानें सबळ बंधन, होय पतन ॥ १२ ॥ कल्पनेनें ब्रह्मीं

संसार, स्थाणु तो चोर। कल्पनेनें भासे स्थिरचर, वांझेचें पोर ॥ १३ ॥ कल्पनेनें पिंड ब्रह्मांड, पृथ्वी नवखंड। कल्पनेनें मायेचें बंड, तंडवितंड ॥ १४ ॥ कल्पनेनें भासे जीव, शिव भाव अभाव। माया अविद्यावैभव, भक्त आणि देव ॥ १५ ॥ ऐसा कल्पनेचा खेळ, भवबंधन मूळ। कल्पना शून्य तैं सकळ, मिथ्या भवजाळ ॥ १६ ॥ कल्पनेचें होय संहरण, यासि कारण। सेवितां सद्गुरुचरण, चुके जन्ममरण ॥ १७ ॥ कारण निद्रा हे स्वप्नासि, त्यासि प्रबोध नाशी। रविबिंबीं कैंची दिननिशी, स्वयंप्रकाशीं ॥ १८ ॥ स्वप्नावस्था प्रबोधीं जैसी, बद्धता तैशी। स्वरुपीं स्वानंदराशी, कळे ज्याचें त्यासि ॥ १९ ॥ बद्धता मुळीं मिथ्या जे ठायीं, तेथें मोक्ष तो कायी। अजन्म्यासि पाहतां कोठेंही, मरण झालें नाहीं ॥ २० ॥ बद्धमोक्ष म्हणणें हा भ्रम, भ्रांतबुद्धिश्रम। वाउगाचि शीण संभ्रम, पूर्वानुक्रम ॥ २१ ॥ एवं दोन्ही मिथ्या मृगजळ, भासे तुंबळ। पूर्णानंदीं पाहतां केवळ, बद्धमोक्ष तो टवाळ ॥ २२ ॥ वेदवेदांतप्रतिपाद्य, वस्तु स्वसंवेद्य। हरिहरां सद्गुरुपद वंद्य, अनादिसिद्धाद्य ॥ २३ ॥ बद्धमोक्षाचें विवरण, प्रश्नोत्तर जाण। संशयनिरसन संपूर्ण, करितां होत श्रवण ॥ २४ ॥ **निजानंद** रंगला **रंगीं**, जैसें तोय तरंगीं। बद्धमोक्ष कैंचा निस्संगीं, सुवर्णरंगीं ॥ २५ ॥

---

## ११. स्फुट पदें.

### १.

सखया रंगा रंगवीं माझें मन, संशय तोडूनि जोडावें समाधान ॥ ध्रुवपद ॥ कोठें आहे तद्धाम? मायापुरीं। मायापुर कोठें तें? आत्मनगरीं। कैसा वर्ते सिद्ध तो? नटापरी। पुनर्जन्म आहे कीं ना? संसारीं ॥ स० ॥ १ ॥ भक्त कोण? जो भूतदया वाहे। ज्ञानी कोण? जगचि मिथ्या पाहे। कर्म कोण? निर्हेतुक होत आहे। कोण विद्वान्? आपणां जाणताहे ॥ स० ॥ २ ॥ शूर कोण? कामादि संहारिले। मित्र कोण? धर्मासि वोडियलें। थोर कोण? कीर्तीतें जोडियलें। नीच कोण? आपणा बुडवीलें ॥ स० ॥ ३ ॥ सुख कोण? शांति ही, दुःख? भ्रांति। हानि कोण? आपणा आपणु-

विस्मृति । लाभ कोण? आपणा आपणप्राप्ति । **रामदास** निज **रंगा** आलिंगिती ॥ स० ॥ ४ ॥ देवस्वरूप कोणतें? आहेपण । मायास्वरूप कोणतें? नाहींपण । संतस्वरूप कोणतें? । संतपण **निजानंद** रंगला **रंगीं** पूर्ण ॥ सखया रंगा रंगवीं माझें मन, संशय तोडूनि जोडावें समाधान. ॥ ५ ॥

२.

सखया सज्जना अंतरिंच्या सांगें गोष्टी । बहुत भाग्यें जाहली तुझी भेटी ॥ ध्रु० ॥ भेटलासि तूं जिवलग गडी । माझ्या जीवींची पुरवीं बा तूं आवडि । बोल कांहीं स्वरूपपरवडि । जेणें नाश पावती संशय-कोडी ॥ स० ॥ १ ॥ विश्वीं राम कीं विश्व असे रामीं । जाहल्या प्रतीति वर्तणें केंवि कर्मीं । वर्ते प्रारब्धें तयासि कोण नेमी । जीव शिव एक कीं दोन नामीं ॥ स० ॥ २ ॥ बोलीं तोषला बोलतां संवगडा । तूं तंव जाणता पुससी लोकचाडा । सावध होऊनि परियसीं पदझाडा । भला जोडला आजि बा साधुजोडा ॥ सखया सज्जना अंतरिंच्या सांगें गोष्टी । बहुत भाग्यें जाहली तुझी भेटी ॥ ३ ॥ सखया सज्जना अनुभवीं मुळींच्या खुणा । जाणणें त्यजूनि समूळ जाणपणा ॥ ध्रु० ॥ घटीं मृत्तिका मृत्तिकेंत घट नाहीं । पटीं पाहतां तंतुचि सर्वदाही । हेम अळंकारीं तैं बुद्धिभेद नाहीं । तैसें विश्वीं रामरूप एक पाहीं ॥ स० अ० ॥ ४ ॥ कर्मीं वर्ततां साहजिक संस्कारें । कदा न शिणें कर्तव्यभोगभारें । ब्रह्मीं हुत करीं ब्रह्मार्पणद्वारें । कर्ता कर्म कार्य जाण एकसरें ॥ स० अ० ॥ ५ ॥ ज्ञानकाळीं संचित दग्ध झालें । अहंत्यागें क्रियमाण सर्व गेलें । वर्ते प्रारब्ध निश्चया जना आलें । कर्मीं वर्ते त्रिविधबोधबळें ॥ स० अ० ॥ ६ ॥ जेंवि आकाशा लघुत्व घटाकाशीं । मठीं अनेक प्रकारें पाहें त्यासी । जीव शिव एकचि ज्ञानराशी । भेद नाहीं जीवशिवां निश्चयेशीं ॥ स० अ० ॥ ७ ॥ संवादीं या दोघांचें पुरलें कोड । प्रीति नांवरे बोलतां गोड गोड । ब्रह्म-वेत्त्या ब्रह्माची नाहीं भीड । अन्य दीपाची दीपासि नाहीं चाड ॥ स० अ० ॥ ८ ॥ ऐसें अंतरा अंतर एक झालें । तेथें सांगतां ऐकतां एक ठेलें । दोघां दोनपण समूळीं हारपलें । **निजानंदीं रंगले**पणहि गेलें । सखया सज्जना अनुभवीं मुळींच्या खुणा । जाणणें त्यजूनि समूळ जाणपणा ॥ ९ ॥

३.

परमेश्वर हरि खास, तोचि परमेश्वर हरि खास ॥ ध्रु० ॥ पंचभूतांचा निर्णय करितां, शून्यीं राहे भास ॥ तोचि० ॥ १ ॥ माझें माझें खंडित करितां, शेवटीं राहे आस ॥ तोचि० ॥ २ ॥ निजमत निजमत सिद्धचि करितां, सर्वा दे समरास ॥ तोचि० ॥ ३ ॥ निजधर्मी जो लवलवकाळीं, दाखवी आत्मप्रकाश ॥ तोचि ॥ ४ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तींस साक्षी, चेतवि परअपरास ॥ तोचि० ॥ ५ ॥ ज्याकरितां जन करिती कर्में, **निजरंगांत** विलास ॥ तोचि परमेश्वर हरि खास ॥ ६ ॥

४.

जडदेहा घेउनि वाणी, गेला ती ऐका वाणी ॥ ध्रु० ॥ घट फोडुनि जनकादिक ते, अनुभविते झाले माती । हा नोहे तुकया तैसा, घट राखुनि धरिली चित्तीं ॥ जडदे० ॥ १ ॥ इतर ते हारुनि दुग्धा, परिणामक घेती पाणी । हा नोहे तुकया तैसा, पय राखुनि चाखी लोणी ॥ जडदे० ॥ २ ॥ इतरें तें फोडुनि कोहं, मग चाखियला तो सोहं । हा नोहे तुकया तैसा, अच्छेद्य पचविला कोहं ॥ जडदे० ॥ ॥ ३ ॥ इतरें त्या मिश्र पुटातें, देउनियां जड टाकियलें । तो नोहे तुकया तैसा, परिसानें हेमचि केलें ॥ जडदे० ॥ ४ ॥ जडबुद्धि अहं या देहा, निजस्वरुपीं वाहुनि गेला । **निजरंगीं** रंग पहाया, **रंगा**नें निश्चय केला ॥ जडदे० ॥ ५ ॥ या बोला सारचि कथितों, दिसणें जें हाचि जन्म । अदृश्य मरण योग्यांचें, **निजरंगीं** अघटित धर्म ॥ जडदेहा घेउनि वाणी, गेला ती ऐका वाणी ॥ ६ ॥

५.

तोचि यत्नि पुरुष साचार ॥ ध्रु० ॥ मृगजळडोहीं हरिपदनौका, घालुनि झाला पार ॥ तोचि० ॥ १ ॥ वेष्टुनि औटी व्यापित सृष्टी, सारित सारासार ॥ तोचि० ॥ २ ॥ व्यसनी झाला हरिभजनाला, फिरुनि करी उच्चार ॥ तोचि० ॥ ३ ॥ **निजानंद निजरंगीं** रंगुनि, केला यत्नीं थार ॥ तोचि यत्नि पुरुष साचार ॥ ४ ॥

६.

संतत हरिचें भजन करावें, अनन्य भावें भूतीं रे ॥ ध्रु० ॥ खटाटोप अवघा हा यत्नचि, कर्म त्रिविध करि पारचि रे । सोहं सोहं निजआनंदें, ब्रह्म-

भुवनिं मग पावें रे ॥ संतत० ॥ १ ॥ अव्यक्ताच्या मूर्ति सगुण या, लोहस्कांतीं अटणें रे । खोटें परि प्रतिबिंब दाखवी, भाळींतिल जो आगम रे । संतत० ॥ २ ॥ ज्ञानें ज्या निजपदा जाणिलें, बुद्धी तेथें न्यावी रे । स्वरुपामाधिं तें अरुप पहाणें, परमामृत हें चाखें रे ॥ संतत० ॥ ३ ॥ हरि हरि म्हणसी पाह्रुनि त्यागिसि, तरि मग कैसा पावे रे । **निजानंद** निजरंगीं रंगुनि, **रंगनाथ** धरि भावें रे । संतत हरिचें भजन करावें, अनन्य भावें भूतीं रे ॥ ४ ॥

७.

कशी मग देव करील दया ॥ ध्रु० ॥ शुष्क हरीचें नामचि वदसी, त्यागिसी ना काया ॥ कशी० ॥ १ ॥ अनन्यभावें शरणचि म्हणवुनि, भोगिसि या विषयां ॥ कशी० ॥ २ ॥ निष्कामाचें भजन सकामी, कर्म न सांग यया ॥ कशी० ॥ ३ ॥ तत्त्वमसीचा बोध न होतां, भवभय हाराया ॥ कशी० ॥ ४ ॥ **निजानंद** निजरंगीं रंगुनि, मन ठेवी पायां ॥ कशी मग देव करील दया ॥ ५ ॥.

८.

भाविक आवडती, ते मज भाविक आवडती ॥ ध्रु० ॥ अर्थी आर्ती जिज्ञासू नर, ते न मना पडती ॥ ते मज० ॥ १ ॥ निद्रिस्तातें जागृत करुनी, जे भावें रमती ॥ ते मज० ॥ २ ॥ अहंवृत्तिच्या टाकुनि भावा, ऐक्यरुपें जडती ॥ ते मज० ॥ ३ ॥ वेडे होउनि **निजानंद** निजरंगीं जे रमती ॥ ते मज भाविक आवडती ॥ ४ ॥

९.

कांहिं विवेक करा, जागा, कांहिं विवेक करा ॥ ध्रु० ॥ उदकाविण बिज उगम न पावे, स्वात्मविचार वरा ॥ जागा० ॥ १ ॥ अद्वैताचें ज्ञान सफल हें, पूर्वाभ्यास हरा ॥ जागा० ॥ २ ॥ बुद्धीचा हट निरसुनि याचें, कांहीं स्मरण वरा ॥ जागा० ॥ ३ ॥ **निजानंद** निजरंगीं रंगुनि, हा भव-उदधि तरा ॥ जागा, कांहिं विवेक करा ॥ ४ ॥

१०.

संतां प्राक्तनकर्म जडे, परि तो भोग तयां न घडे ॥ ध्रु० ॥ खडा मारितां अवनितटावरि, लागुनियां मुरडे ॥ संतां० ॥ १ ॥ हेमवळें तें

मस्तक फुटतां, दुःख तयां न जडे ॥ संतां० ॥ २ ॥. वर्षाकाळीं शुद्ध नदासी, क्षारचि तोय दडे ॥ संतां० ॥ ३ ॥. **निजानंद** निज**रंगिं** पाहतां, पाहणें तें विघडे ॥ संतां प्राक्तनकर्म घडे, पारि तो भोग तयां न घडे ॥ ४ ॥.

११.

अनुभव ज्याचा तो जाणे ॥ ध्रु० ॥ नवलक्ष याती जलचरें पुसती कूर्मासि हे गुह्य गोष्टी । तुमचे मातेचें तुम्ही स्तनपान करितां कैशी तुम्हांस हे पुष्टी । माझे मातेच्या उदरीं याल जेव्हां कळेल हें कृपादृष्टी ॥ अनुभव ० ॥ १ ॥ दशलक्ष पक्षी मुमुक्षु येऊनि पुसती चातकासी । तृषाकाळीं तुम्हां मेघोदक पावे याची क्रिया आहे कैशी । माझे मातेचे उदरीं याल जेव्हां कळेल हें कृपा ऐशी ॥ अनुभव० ॥ २ ॥ व्यालीची वेदना व्यालीच जाणे वंध्या नेणे तो प्रकार । शब्दज्ञानी गुरुपुत्रासी म्हणती ब्रह्म दावा निर्विकार । सत्संगें **निजरंगें** अनुभवी जाणती संशयीं पळे अपार ॥ अनुभव ज्याचा तो जाणे ॥ ३ ॥

१२.

या प्रपंचीं पाहतां दुःखें कैंचीं । **ह**रिजन निजानंदपद भोगिती तें सुख नेणे **वि**रिंची ॥ ध्रु० ॥ वृंदारकफल नामरूपा आलें, पारि तें समूळचि शर्करेचें केलें । सेवूं जातां रसने गोड । पुरवी या चित्ताचें कोड । स्वात्मसुखामृतगोडी । तेथें कैंची उंची नीची ॥ या० ॥ १ ॥ नवज्वरें पयःपान विषवत् झालें । शुक्रपक्षीं चोरटे उपोषित मेले । हरिभक्तां हरिरूप चराचर । अंतःसुख नेणती पामर । विश्वपटीं चित्तंतु त्यासी । म्हणती कुळाई कुंची ॥ या० ॥ २ ॥ व्याल म्हणुनि मणिमाल उपेक्षिति त्यांतें । भ्रांति पडली संकल्पसंनिपातें । **निजानंद**पदभुवनीं हाही । प्रपंच पाहतां उरला नाहीं, सहज पूर्ण निज**रंगीं** । चर्चा काय वदूं ती त्याची ॥ या प्रपंचीं पाहतां दुःखें कैंचीं । **ह**रिजन निजानंदपद भोगिती तें सुख नेणे **वि**रिंची ॥ ३ ॥

१३.

अवघा तूंचि तूं, मी नाहीं ॥ ध्रु० ॥ लहरी तरंग उदधि । तैसी ही जीवउपाधि । आत्मा अखंड निरवधि ॥ अवघा० ॥ १ ॥ सांडुनि देहममता । तवपदीं नित्य रमतां । मग कैंची विषमता ॥ अवघा० ॥ २ ॥

आत्मवें पाहतां देवा । श्रुति वदति एकमेवा । **निजरंगीं रंग** कैंचा दावा ॥ अवघा तूंचि तूं, मी नाहीं ॥ ३ ॥

१४.

ब्रह्म सनातन रे, तो हा ब्रह्म सनातन रे ॥ ध्रु० ॥ निगमागमनीतिशास्त्रविशारद, अवलीया तनु रे ॥ तो हा० ॥ १ ॥ विधि हर सुर नर वंदिति ज्यातें, पदरजपावन रे ॥ तो हा० ॥ २ ॥ पूर्ण **रंग** निज पालक तो रे, दुःखविनाश नुरे ॥ तो हा ब्रह्म सनातन रे ॥ ३ ॥

१५.

पूर्वज्ञात नसतां तुजला, जग भासत विस्मय नोहे ॥ ध्रु० ॥ मांसावारि विवर्त ठेला, अहि सत्यचि कैसा पाहें । या मूलमूल तें पाहतां, सत्तेवरि शून्यचि राहे । कल्पनाहि बहुविध झाली, त्या नामरूपें जग ठेलें । ज्ञेय ज्ञाता ज्ञानचि अवघें, मायेनें विवर्त केलें । वृत्तीनें अनुभव दिधला, तो न्यायचि कैसा पाहें ॥ पूर्व० ॥ १ ॥ ही अनिर्वचनि हरिमाया, नेणिव हें रूप जियेचें । लवलवीं त्रिकाळचि साधी, परि ब्रह्म न लोपत साचें । हा इंद्रजाल बिंदूचा, देह दाउनि नाहिंच केला। वटबीजीं दाउनि वट तो, बीजाचा पर्वत केला । अरुपामधिं अनंत रूपें, दावी हें नवल न लाहे ॥ पूर्व० ॥ २ ॥ वंध्यासुत मृगजळडोहीं, बुडतां त्या अंधचि काढी । तो अंधचि पाहिल कैसा, संशय हा अवघा सोडीं । निर्धर्मीं धर्मचि म्हणतां, तो अवघा विवर्त सारा । हें गारुड झालें कैसें, याचा तो विचार न करा । परिहारीं म्हणउनि हारीप्रति प्रार्थी **रंग निजा** हें । पूर्वज्ञात नसतां तुजला, जग भासत विस्मय नोहे ॥ ३ ॥

१६.

तो एक निजयोगी, निजयोगी । परदारा स्वयें स्वयें भोगी ॥ ध्रु० ॥ निशंक मात्रागमनी, भक्षी अभक्ष्य शंका नमनी ॥ तो० ॥ १ ॥ गोवध घडला ज्याला, नित्य सुरापान जो प्याला ॥ तो० ॥ २ ॥ **निजरंगीं रंगेला**, अपुले उगमीं संगम जाला ॥ तो एक निजयोगी, निजयोगी । परदारा स्वयें स्वयें भोगी ॥ ३ ॥

१७.

बोल रे बोल कान्हा । काय बोलसी निजनयना ॥ ध्रु० ॥ बोल बोलवीत कोण । बोल उद्भवला कोठून । त्याचे एकांतीं आहे कोण । त्याचा न कळे महिमान ॥ बोल रे० ॥ १ ॥ कृष्ण म्हणे अहो आई । मूळ शोधोनियां पाहीं । निजमूळ पडतां ठायीं । चुकेल जन्ममरण ॥ बोल रे० ॥ २ ॥ निजरंगीं रंगतां तद्रूप । पाहतां सद्गुरुपूर्णस्वरूप । आपेंआप होइंजे । बोल रे बोल कान्हा । काय बोलसी निजनयना ॥ ३ ॥

१८.

बापा तें नोहे, तें नोहे । व्यर्थचि श्रमि कां व्हावें ॥ ध्रु० ॥ साधुनि आसन मुद्रा, । शब्दज्ञाना बोलति क्षुद्रा ॥ बापा० ॥ १ ॥ नवरस करूनि कवि, । पोटासाठीं सोंगें दावी ॥ बापा० ॥ २ ॥ म्हणती काळें पिवळें । दाबुनि धरिती बळकट डोळे ॥ बापा० ॥ ३ ॥ बळेंचि शिष्य करिती । विशाळ यंत्रांतें पसरिती ॥ बापा० ॥ ४ ॥ व्यर्थचि टिळाटोपी । समाधि म्हणूनि जाती झोंपी ॥ बापा० ॥ ५ ॥ निजरंगीं रंगलें । रंगुनि रंगपणा मावळलें ॥ बापा तें नोहे, तें नोहे । व्यर्थचि श्रमि कां व्हावें ॥ ६ ॥

१९.

भवजलनिधितरणोपाया, श्रीहरिचे गुणगण नौका ॥ ध्रु० ॥ अरे नाना चरितें श्रीहरिलीला । दूरि करिति कलीला । ऐसें जाणुनि नवघननीला । न भजसि दुःशीला । विषयीं रत होउनि अनुदिनिं पडलासी । धिग् धिग् तूं नरकीं बुडसी । वावुगी मानुनि शंका ॥ भव० ॥ १ ॥ तरले जन हे हरिभजनेंकरुनी । सद्भावा धरुनी । रमती हरिचरणीं ममता हरुनी । चिन्मयपद धरुनी । दीक्षा लावुनि ते मुमुक्षु भजनीं । लाविति मन अनुदिनरजनी । प्रक्षाळुनि संसृतिपंका ॥ भव० ॥ २ ॥ कैंचा भवसागर कैंची माया । जड जीव श्रमाया । स्वप्नीं गृह सुत पति कांचन जाया । चित्रतरूची

छाया । मिथ्या सर्वहि पूर्ण प्रबोधीं । रंगीं रंगला निजानंदीं । निस्तरुनी भवभयशोका । भवजलनिधितरणोपाया, श्रीहरिचे गुणगण नौका ॥ ३ ॥

२०.

जें जें झालें दैवयोगें । तें तें योगी मानी हें वावुगें ॥ ध्रु० ॥ सुखदु:खात्मक देह वळखुनी । चित्त स्वरूपीं स्थिर करि वळुनी । चंद्र जसा निश्चळ परि गगनीं । फिरे जेंवि अभ्रयोगें ॥ जें जें० ॥ १ ॥ अज्ञदशे जें कर्म निपजलें । कर्ता मी हें म्हणुनि वाटलें । उसनें त्या मापें फेडियलें । भोक्ता अहं योगें ॥ जें जें० ॥ २ ॥ यापरि योगी सांडुनि शोका । नुपेक्षी गृहवासनादिकां । सहज निजरंगीं रंगूनि सम्यका । झाला कि तया आंगें ॥ जें जें झालें दैवयोगें । तें तें योगी मानी हें वावुगें ॥ ३ ॥

२१.

प्रारब्ध भोग आनंदें, एका घरिं नांदति दोघे ॥ ध्रु० ॥ मांडिला खेळ गारोडी, जाणुनियां सर्वहि खोटें । तैसी ही देखुनि सृष्टी, ज्ञान्याला कौतुक वाटे । बा भिन्न विषय दोहींचे, मग भांडण लागेल कैंचें । काय कमी होय ज्ञात्याचें, या प्रारब्धाच्या योगें ॥ प्रारब्ध० ॥ १ ॥ वस्तु जरी मिथ्या ठरली, तत्काळचि नष्ट न होयी । सुखदु:खभोग व्हायाला, सत्याची गरजचि नाहीं । कां संशयडोहीं बुडसी, तूं व्यर्थ आग्रहा पढसी, आवडे तेंचि बडबडसी, भुललासी मायायोगें ॥ प्रारब्ध० ॥ २ ॥ प्रारब्धें मिथ्या जग ठरवुनि आतां, कां कारितां संसारातें । वरचेवर ऐसें पुसती, अविचारी तत्वज्ञाते । दोहींचीं भिन्नचि कामें, नेणति या सिद्धांतातें । प्रारब्धभोग तो देई, निजबोधचि निजसौख्यातें । निजरंगीं निजआनंदें, दोन्हीही कौतुक पाहें । प्रारब्ध भोग आनंदें, एका घरिं नांदति दोघे ॥ ३ ॥

२२.

रविवंशाभरणा हो यावें ॥ ध्रु० ॥ सत्यज्ञानानंत अपारा । विगतविकारा जगदोद्धारा । निगमागमसारा यावें ॥ रवि० ॥ १ ॥ निर्गुणनित्यनिरामयधामा । अवाप्तकामा मंगलधामा । मुनिजनमनविश्रामा यावें ॥ रवि०

॥ २ ॥ विश्वविलासा श्रीजगदीशा । पूर्णपरेशा सच्चिद्भासा । निजरंगा अविनाशा यावें ॥ रविवंशाभरणा हो यावें ॥ ३ ॥

२३.

हें रे, रे हें, रे रे, ध्याईं ॥ ध्रु० ॥ एक नवल देखिलें भाई । तेंचि बोलत नोबले कांहीं । बोलल्यासिच ठाव पैं नाहीं । ऐसें तें काय एक पाहीं बापा ॥ हें रे० ॥ १ ॥ तें हें जवळि परि भासेना । नांदे डोळ्यांत परि दिसेना । ऐसें अलक्ष्य बहु लक्षेना । ध्यानीं अतर्क्य तें तर्केना ॥ हें रे० ॥ २ ॥ तेंचि सर्वांहूनि थोर आहे । ल्हान राईहुनिही पाहें । तें वर्णिलें कोणा नवजाये । ऐसें म्हणणें तेंचि तें आहे । हें रे० ॥ ३ ॥ गुरुकृपे जेव्हां पाहसी । स्वानुभवें तुझाचि तूं होसी । मग उरी कैंचि बोलासी । निजरंगीं रंगुनि मौन रहासी रे रे ॥ हें रे, रे हें, रे रे ध्याईं ॥ ४ ॥

२४.

मी माझें विसरें । नाहीं साधन बा दुसरें ॥ ध्रु० ॥ दुःखित जीव भ्रमें भुललाहे । कारण त्यासि अहंममता हें ॥ मी माझें० ॥ १ ॥ यासाठीं श्रुति संग्रहणें । सहकरणें मानस निग्रहणें ॥ मी माझें० ॥ २ ॥ हाचि मंत्र सनकादिक गाती । भाविक हृत्कमलांतरिं ध्याती ॥ मी माझें ॥ ३ ॥ विद्वज्जनिं हा दृढत भाव । हाचि पूर्ण निजरंगस्वभाव ॥ मी माझें विसरें । नाहीं साधन बा दुसरें ॥ ४ ॥

२५.

सज्जन जन सारे जन सारे । पाहतां वस्तुविचारें ॥ ध्रु० ॥ घटमठमहदाकाशीं । आकाश अद्वय अन्यअविनाशी ॥ सज्जन० ॥ १ ॥ पाहतां नाना ध्वनी । अवघा एकचि नाद निदानीं ॥ सज्जन० ॥ २ ॥ चित्सागरिंचे तरंग । सहजीं सहज पूर्ण निजरंग ॥ सज्जन जन सारे जन सारे । पाहतां वस्तुविचारें. ॥ ३ ॥

२६.

देशिक प्रकट निदान, वेद सांगे ॥ ध्रु० ॥ भवहर सुखकर बोधिती सुज्ञान ॥ देशिक० ॥ १ ॥ मीपण टाकुनि, चिन्मय होउनि, मन लाहे

समता समान ॥ देशिक० ॥ २ ॥ **निजरंगें** रंगपणें मन, उन्मन होउनि, सांडीं तूं देहभान । वेद सांगे, देशिक प्रकट निदान ॥ ३ ॥

२७.

सुखकर भजन **हरीचें** तुम्हि करा । करा करा भव तरा ॥ ध्रु० ॥ सारासार विचार करुनि हा, भवसिंधु तुम्ही तरा ॥ सुखक० ॥ १ ॥ दुरितहरणपदीं शरण शरण पण, **निजरंगीं** अनुसरा ॥ सुखकर भजन हरीचें तुम्हि करा । करा करा भव तरा ॥ २ ॥

२८.

श्री**राम जय**राम आनंदकंदा । हरहृदयविश्रामा जय जय परमानंदा ॥ ध्रु० ॥ नित्य **राम शं**कर ध्याय । तेणेंकरुनि मन उन्मन होय । मन उन्मन होउनि विषयार्णव । ऐसा **राम** म्हणतां जन्म हा जाय ॥ श्री**राम**० ॥ १ ॥ सदा सर्वदा होतें पूजन । तेथेंचि हें चित्त लावितां मन । रात्र आणि दिवस करितां ध्यान । नपवति गर्भवास सद्गुरुवचन ॥ श्री**राम**० ॥ २ ॥ सबाह्याभ्यंतरीं श्री**राम** एक । गुरुसी शरण जावें तुझा विवेक । तव ········नेनें हा लोक । सहज **निजनंदीं रंग**ला हो निःशंक ॥ श्री**राम जय**राम आनंदकंदा । हरहृदयविश्रामा जय जय परमानंदा ॥ ३ ॥

२९.

तैसें सुख या संसारीं । मानुनि हित केलें दूरी ॥ ध्रु० ॥ मृगजळ भावी दृढ पाणी । धांवुनि शिणतो मृग रानीं ॥ तैसें० ॥ १ ॥ पतंग दीपीं सुख मानी । नेणे आपुलिच कीं हानी ॥ तैसें० ॥ २ ॥ आवडि सेवी गळ मासा । न कळे होइल खेळ कसा ॥ तैसें० ॥ ३ ॥ लोभ धरीतो कोंसला । करुनि आपणाचि गुंतला ॥ तैसें० ॥ ४ ॥ ऐसे विषयीं जे भुलले । ते सहज निज**रंगीं** अंतरले ॥ तैसें सुख या संसारीं । मानुनि हित केलें दूरी ॥ ५ ॥

३०.

मंगलधामा कल्याणा **रामा** ॥ ध्रु० ॥ भाविकभूषण सात्विकतोषण । साधकपोषणनेमा ॥ मंगल० ॥ १ ॥ दानवभंजन भवभयगंजन । सज्जन-

रंजननामा ॥ मंगल० ॥ २ ॥ राक्षसमर्दन सन्मतिवर्धन । चरणीं कारित प्रणामा ॥ मंगल० ॥ ३ ॥ निजरंगपदीं कधिं भंग न पावे । देई भक्ति-प्रेमा ॥ मंगलधामा कल्याणा रामा ॥ ४ ॥

३१.

जिणें दोंदिवसांचें नाहीं साचें । सत्य बोलतों वाचे ॥ ध्रु० ॥ उपजत दिवसापासुनि काळें, गणित नेमिलें याचें । त्याहीमध्यें आयुष्य परिमित, दुःख त्रिविधगुणांचें ॥ जिणें दों० ॥ १ ॥ बाळपणीं तें भय खेळाचें, प्रौढ वयीं वनितांचें । उत्तर वयिं असे भय रोगाचें, शेवटिं भय मृत्यूचें ॥ जिणें दों० ॥ २ ॥ अस्थिमांसनखाशिरनाडीचें, मोटाळें चर्माचें । मुसीं ओतलें हें त्रिगुणात्मक, अटकळ प्रारब्धाचें ॥ जिणें दों० ॥ ३ ॥ ऐकुनि उत्तर नित्य निरंतर, भजन करा रामाचें । निजानंदपदिं रंगुनि राघव, ध्यातां सार्थक या जन्माचें ॥ जिणें दोंदिवसाचें नाहीं साचें । सत्य बोलतों वाचे ॥ ४ ॥

३२.

श्रीगुरुराजधणी, असतां कळिकाळा न गणीं ॥ ध्रु० ॥ काय उणें मज केलें त्यानें, झालें पट्टराणी ॥ श्रीगुरुराज० ॥ १ ॥ जातां एकांता, मुळीं हारपली चिंता । जिकडे पाहें तिकडे अवघी, रंगलि निजसत्ता ॥ श्रीगुरु-राजधणी, असतां कळिकाळा न गणीं ॥ २ ॥

३३.

तरीच जन्मा यावें, तें रूप पहावें ग, बाई पहावें ग ॥ ध्रु० ॥ चिंतिति हरिहर, रूप जें नागर, असे परात्पर, अलक्ष्य अगोचर, तेथें मन हें न्यावें ग ॥ तरीच० ॥ १ ॥ धोंधों झांगड, वाद्यें अवघड, नाद धडाधड, होत भडाभड, अनुहत ज्याचीं नावें ग ॥ तरीच० ॥ २ ॥ उलटपलटकर, त्रिकूटशिखरपर, अमृत झरझर, वाहे निरंतर, योगबळें तें प्यावें ग ॥ तरीच० ॥ ३ ॥ निजानंदें नारायणछंदें, सद्गुरुबोधें, रंगीं रंगुनि रहावें ग ॥ तरीच जन्मा यावें, तें रूप पहावें ग, बाई पहावें ग ॥ ४ ॥

३४.

भासे जगदाकार तरंग ॥ ध्रु० ॥ मायामृगजळ शाश्वत नसतां, धांवति जेंवि कुरंग ॥ भासे० ॥ १ ॥ पुत्रमित्रगणगोत्र सर्वही, गजरथधेनुतुरंग ॥ भासे० ॥ २ ॥ दृग्भ्रमयोगें रज्जु न जाणे, भासे तीव्र भुजंग ॥ भासे० ॥ ३ ॥ पूर्णरंग निजरंगीं रंगुनि, होय सहज भवभंग ॥ भासे जगदाकार तरंग ॥ ४ ॥

३५.

आजि धन्य, धन्य धन्य, धन्य धन्य, मी वो । हरिविणें न देखें अन्य, मी वो । पूर्वी आचारिलें नेणें कोण पुण्य, मी वो ॥ ध्रु० ॥ तये गोकुळीं गोपाळ भेटला । माझ्या हृदयीं आनंद बहु दाटला । भवसिंधु हा समूळचि आटला । सोनियाचा सुदिन आजि वाटला ॥ आजि धन्य० ॥ १ ॥ हाता आले श्रीहरिचे पाय वो । सुख ब्रह्मांडीं तें नसमाय हो । जोडला हा मज तरणोपाय वो । आतां भवभय बापुडें तें काय वो ॥ आजि धन्य० ॥ २ ॥ आतां कवणाचा नव्हे मी पांगिला । देहबुद्धिचा संग भंगला । लाभें लाभ बहु होतसे चांगला । सहज निजानंदीं पूर्णरंगें रंगला वो ॥ आजि धन्य, धन्य धन्य, धन्य धन्य, मी वो ॥ ३ ॥

३६.

फिरोनियां काय, वन वन वन ॥ ध्रु० ॥ गोड दिसे बहिरंग जनांप्रति, अंतरिं उध्वस, वण वण वण ॥ फिरोनियां काय० ॥ १ ॥ तीर्थतपें बहु केलीं जरि ते, जागति षड्रिपु, दण दण दण ॥ फिरोनिया काय० ॥ २ ॥ पूर्णरंग निजशांति नये जरि, कामज्वरें तनु, फण फण फण ॥ फिरोनियां काय, वन वन वन ॥ ३ ॥

३७.

सांडुनि कां मातें, प्राणी भजती कामातें ॥ ध्रु० ॥ शाश्वत निजसुखदायक त्या मज, नेणति श्रीरामातें । काम्य निषिद्धें कर्मे करिती, होती

प्राप्त श्रमांतें ॥ प्राणी० ॥ १ ॥ दुःखरूप हा विषयसमागम, नेइल अंधतमातें । देखत देखत अंध बधिर नर, नेणति परिणामातें ॥ प्राणी० ॥ २ ॥ मी निजरंग अभंग तया मज, मुनिमनविश्रामातें । सांडुनि विषय विषासम सेविती, सांगुं किती अधमांतें ॥ सांडुनि का मातें, प्राणी भजती कामातें ॥ ३ ॥

३८.

आतां वसुधातळहि बुडो । वरि हें नभमंडळहि पडो ॥ ध्रु०॥ निश्चय कीं निजराम स्मरावा, हा सहसा न खुडो ॥ वरि हें० ॥ १ ॥ शेवटील पाळी, येणें गोड करूं समूळीं । आन उपाय नसे या काळीं, ध्यावा वनमाळी ॥ वरि हें० ॥ २ ॥ जन म्हणो वेडें, परि मी न पाहें त्यांच्याकडे । साधन तें साधावें ऐसें, परम पद जोडे ॥ वरि हें० ॥ ३ ॥ असेल प्रारब्धीं, तरि हें न चुके कर्म कधीं । मृगजलास्तव क्लेशी होणें, विषम हे बुद्धि ॥ वरि हें० ॥ ४ ॥ उरलें असेल करणें, भजनीं लावावीं करणें । लक्ष चौऱ्यांयशीं जन्माचें, येथें संकट निस्तरणें ॥ वरि हें० ॥ ५ ॥ सहज पूर्ण निजरंगा मजवरि, करीं गा अनुकंपा । पूर्णकृपे अवलोकुनियां मज, पावन पथ सोपा ॥ आतां वसुधातळहि बुडो । वरि हें नभमंडळहि पडो ॥ ६ ॥

३९.

धांव कृपावंते माय माझे विठ्ठले । तुजविण गमेना चित्तालागीं । मम धृत्ति चरणीं लागु दे ॥ ध्रु० ॥ कर्म प्रवृत्ति यांच्या प्रवाहांत गुंतलों । वासना सार्पिण इच्या योगें बहु त्रासलों । कुठवर आतां आंवर करूं मी, तुजविण कवणाशीं सांगूं ॥ धांव० ॥ १ ॥ सत्कर्म पाहूं जातां आड येतें कर्म गे । कर्मचि लीन होतां नये कैसा खुंट गे । प्रारब्धानें वेष्टियेलें नेईं नेईं पार गे ॥ धांव० ॥ २ ॥ जन्मयोनि फिरतां फिरतां मोठा झाला शीण गे । सुकृतातें साह्य म्हणतां अंतर नाहीं शुद्ध गे । शुद्ध सुमतिचा भाव दावुनी आपुल्या रंगीं नेईं गे ॥ धांव० ॥ ३ ॥ निजरंगीं निजदेहीं स्फुरण अंतरीं । तुझिये नामीं माझी वृत्ति ठसो ही जरी । निजरंगें हा

करुणाशब्दें पुष्पमाला आणि गे ॥ धांव कृपावंते माय माझे विठ्ठले । तुजविण रमेना चित्तालागीं । मम वृत्ति चरणीं लागु दे ॥ ४ ॥

४०.

रुमझुम धुमधुम थिरिकिटि धिग् धिग् नाचाप्रति गणपती । आधारचक्रीं नाचुं लागले स्वानंदें नाचती । नाच नाच मोरेश्वर म्हणती ईश्वर दाक्षायणी । उत्तम गौतम गार्गी गालव वसिष्ठ बसले मुनी । ऐशा ऐशा अनसूयादिक ऋषिपत्न्या कामिनी । चाल । त्या नाच म्हणाति सकळाल्या, अहो मोरया । देव नाचू ते लागले, अहो मोरया । नाचे ब्रह्मांड भ्रांतितें, अहो मोरया । चाल पहिली । नाच नाचला देवचि झाला संत गुणीं गोंविती ॥ रुमझुम० ॥ १ ॥ कामसरिता नाचुं लागल्या क्रोधादिक पर्वत । मोहसिंधु तो नाचुं लागला अहंवृक्ष नाचत । शान्तीधरणी नाचुं लागली ज्ञानागर नाचत । वासना उतरंडी नाचे भक्तिचूल नाचत । चाल । गुरुकृपाशिर्कि नाचती, अहो मोरया । देव देव्हारे नाचती, अहो मोरया । चाल पहिली । जारज अंडज स्वेदज उद्भिज वृक्ष पहाड नाचती ॥ रुमझुम० ॥ २ ॥ एकविस स्वर्गे नाचुं लागलीं नाचति रात्रंदिस । सप्त पाताळ नाचुं लागले शेषादिवराह सकळिक । नाचसंधिसी त्रिपुरासुर तो कपटी कीं मायिक । त्रिपुरामध्यें शिरोनि बसला मनामधें घातक । चाल । म्हणे पार्वती पुरे मोरया, अहो मोरया । वे उचलुनी कडे मोरया, अहो मोरया । जड लागे बाळ मोरया, अहो मोरया । चाल पहिली । क्षितिवरि गणपति पार्वति उतरी देव मनीं शोधिती ॥ रुमझुम० ॥ ३ ॥ पाय झाडिला दैत्य मारिला व्यासा सांगे विधी । योजन बारा प्रेतपसारा त्र्यंबकक्षेत्रामधीं । चाल । नाचे भगवान् चिंतामणि, अहो मोरया । नाचे निजरंगीं रंगुनी, अहो मोरया । नाचे सिंधूपुरीं, अहो मोरया । चाल पहिली । म्हणुनि अहो मोरया अहो मोरया नाच ऐकती । स्वानंदें निजानंदसुखपदीं अक्षयची रंगती ॥ रुमझुम धुमधुम थिरिकिटि धिग् धिग् नाचाप्रति गणपती । आधारचक्रीं नाचुं लागले स्वानंदें नाचती ॥ ४ ॥

## ५६.

लाभालाभीं संतोष खेद न मानिती ॥ ध्रु० ॥ ज्ञानी निजलाभें संपन्न । जैसें ध्रुवा अक्षय स्थान । क्षीरसागरीं उपमन्य । कांजी न वांछी सहसा ॥ लाभालाभीं० ॥ १ ॥ दिनमणि सान्निध आलें गेलें । दीप आणिलें वा मालविलें । तेणें न्यून पूर्ण झालें । प्रताप काय रवीचे ॥ लाभालाभीं० ॥२॥ जग मृगजल हें नसतां दिसे । दृश्य दृष्टी भास भासे । कर्पुरदीपीं जैसा तैसे निजानंदीं रंगलें ॥ लाभालाभीं संतोष खेद न मानिती ॥ ३ ॥

## ५७.

राममय वृत्ती झाली आतां काय उणें । अहंकारदग्ध झाला स्वात्मसुख घेणें ॥ ध्रु० ॥ ज्ञानदीप लावुनियां तमनाश केला । मजमाजी पाहतांचि स्वप्रकाश झाला ॥ राममय० ॥ १ ॥ जीवऐक्य जालें जगत् ब्रह्म दिसे । पशु पक्षी नाना याती एकाकार भासे ॥ राममय० ॥ २ ॥ बोलि बोलुनि मुनि गेले आतां काय बोलूं । पूर्ण शेजेवरि निजरंगीं रंगुनि लोळूं ॥ राममय वृत्ति झाली आतां काय उणें । अहंकार दग्ध झाला स्वात्मसुख घेणें ॥ ३ ॥

## ५८

जडली गुरुचरणीं आवडी । स्वानंदाची उभविली गुडी ॥ ध्रु० ॥ स्वरूपाची प्राप्ति झाली । ममता गेली समता आली । षड्वर्गाची बोहरी केली । आशा तृष्णेसहीत ॥ जडली० ॥ १ ॥ भेद झाला पाठीमोरा । गुणदोषांचा नलगे वारा । विश्वीं देखे विश्वंभरा । नाहीं थारा भ्रांतीसी ॥ जडली० ॥ २ ॥ दया वाढली अपार । निंदा द्वेष झाला भार । विवेक वैराग्य निर्धार । हे साचार बळावले ॥ जडली० ॥ ३ ॥ सदा संतोषेसीं खेळ । नवविधारी गदा रोळ । निरावकाश सुखकल्लोळ । काळ वेळ नाठवे ॥ जडली० ॥ ४ ॥ भोगमोक्षीं वीतरागी । शांति बाणली सर्वांगीं । निजानंदरंगसंगीं । ब्रह्मयोगी विराज तूं ॥ जडली गुरुचरणीं आवडी । स्वानंदाची उभविली गुडी ॥ ५ ॥

## श्लोकपंचक.

जागोनि जो स्वप्न विभावितांहे, । जागोनि निद्रासुख सांगताहे, ॥
जागोनियां जागतयासि पाहे, । जाणे तया ग्रासुनि तेंचि आहे. ॥ १ ॥
जाणे तयातें सहसा न जाणे, । तेणें तया लागुनि तो न जाणे. ॥
जाणे न जाणे द्वयही न जाणे । मी जाणणें निश्चित वात आणे. ॥ २ ॥
व्यामोह आला कवणा न भासे, । कीं बोध झाला कवणा न भासे. ॥
बोले असें कोण कदा न भासे । बोले न बोले तरि दीर्घ हांसे. ॥ ३ ॥
भवी तयालागुनि लाज नाहीं. । स्ववी तया लागुनि लाज नाहीं. ॥
खोली गमी त्याप्रति लाज नाहीं । बोली नसे त्याविण काज काई ॥ ४ ॥
जें बोलिजे त्याहुनियां निराळें । तैं आकळे निश्चित कोण काळें? ॥
स्वप्रत्यया प्रत्यय तैं असेना । रंगासि तो रंग दुजा दिसेना. ॥ ५ ॥

---

# गरुडसत्यभामागर्वहरण.

( डफगाणें—ओंव्या. )

प्रथम प्रणमितां गणपति । देइल सद्बुद्धीसी स्फूर्ति. । वंदूं सरस्वति आदिशक्ति, । जे मूळ माया. ॥ १ ॥ परब्रह्म, परात्परु, । लीलाविग्रही, साकारु, । तो सद्भावें सद्गुरु । वंदूं आतां. ॥ २ ॥ नमितों श्रोते, साधुसंत, । जे दीनदयाळ मूर्तिमंत, । जे कां सत्यज्ञानानंत । जगदोद्धारी. ॥ ३ ॥ ज्यांची होतां कृपादृष्टि, । जाहली परमामृतें वृष्टि, । केली चिन्मय अवघी सृष्टि, । तन्मय झालों. ॥ ४ ॥ मी एक भक्त, मी एक मुक्त, । मी एक अनन्यसाधनयुक्त, । हाही स्फुंद विरला, विरक्त । होउनि ठेला. ॥ ५ ॥ तिळतुल्य जो अभिमान, । तो दुःख देईल मेरुसमान. । भक्तवत्सल तो जगजीवन । अंतरसाक्षी. ॥ ६ ॥ तेषांमहं समुद्धर्ता, । योगक्षेम मी पाववितां, । भयकृद्भयनाशन तत्वता । भगवद्वाक्य. ॥ ७ ॥ निरसी भक्तांचा अभिमान । पतीतपावन श्रीभगवान् । यदुकुलतिलक नंदनंदन । रुक्मिणी-

रमण जो. ॥ ८ ॥ ऐसी ऐकुनि नवरसवाणी, । श्रोते सादर झाले श्रवणीं, । कथा परिसावया इफगाणीं । पावनकारी. ॥ ९ ॥ वक्ता विनवी अनन्य-भावें. । " श्रोतीं श्रवणीं सादर व्हावें. । मज हें कृपादान । द्यावें अवधानाचें. ॥ १० ॥ गरुडसत्यभामेचा गर्व । हरिनें हरिला जो अपूर्व, । तें सादर होउनि सर्व । परिसा आतां. ॥ ११ ॥ सत्यभामेच्या मानसीं । " जो हा दुर्लभ सदाशिवासी । तो मज पूर्व पुण्यें फळासि । आला आतां. ॥ १२ ॥ ब्रह्मादिकांसि नये ध्याना, । अतर्क्य तर्केना अनुमाना, । त्या मीं अनुभवितें मधुसुदना, । माधवराया. " ॥ १३ ॥ " अनंतब्रह्मांडनायक हरी । स्कंधीं वाहें, जैसी मोहरी. " । ऐसा गरुडाचे अंतरीं । दुरभिमान. ॥ १४ ॥ " ' तन्न, तन्न. ' ऐसें श्रुति । ' नेति 'शब्दें ज्या गर्जती, । त्या मी श्रीविष्णूची मूर्ति । स्कंधीं वाहें. " ॥ १५ ॥ ऐसा उभयतांचे मनीं । गर्व झालासे, म्हणवूनि । विचित्र विनोद चक्रपाणि । करिता झाला. ॥ १६ ॥ रामअवतारीं श्रीरामें । प्रयाण करितां पुरुषोत्तमें, । हनुमंतासि वाचानेमें । नेम केला. ॥ १७ ॥ " कृष्णअवतारीं मी तुज । भेटी दईन अधोक्षज. " । ऐसें ऐकुनि अंजनीतनुज । बैसे ध्यानीं. ॥ १८ ॥ कृष्ण म्हणे " वैनतेया, । भक्तशिरोमणि, मम-प्रिया, । हनुमंतासि आणावया । जावें वेगीं. ॥ १९ ॥ तूं अगाध परा-क्रमी, । सुरवर जिंकुनियां संग्रामीं । अमृत आणिलें, अतर्यामीं । जाण-तसों. " ॥ २० ॥ गरुड म्हणे " देवें बरवें । कार्य समजोनि सांगावें. । योग्यायोग्य हें जाणावें । लागे आधीं. ॥ २१ ॥ पालेखाइर प्लवंगम । आणायाचें कोण काम ? । आज्ञा समर्थ. " विहंगम । म्हणे आतां. ॥ २२ ॥ ऐसीं बोलुनि उद्धत वचनें, । वेगीं जाऊनि दुरभिमानें, । समुद्रतीरीं देखे नयनें । हनुमंतासि. ॥ २३ ॥ तंव ध्यानस्थ अंतरीं, । मुद्रा लावुनियां खेचरी, । समाधिसुमनाच्या अरुवारीं । बैसलासे. ॥ २४ ॥ कायावाचामनें हनुमंता । एक भक्तिविशेषता. । आणिक नेणे सीता-

कांता– । वांचुनि कांहीं. ॥ २५ ॥ अशनीं, शयनीं, गमनाऽगमनीं, । जागृति, सुषुप्ति आणि स्वप्नीं, । जनीं, वनीं तो दिनरजनीं । राम देखे. ॥ २६ ॥ ऐसा देखोनियां मारुती, । गरुडें समीप जाउनि, हातीं । धरूनि, म्हणे "तुजप्रति । आलों आम्ही. ॥ २७ ॥ द्वारकाधीशें राधा- रमणें । तुज बोलाविलें कृष्णें. । अपूर्व दर्शन त्याचें घेणें । आजि आतां. ॥ २८ ॥ सोळा सहस्र अंतःपुरें, । अष्टनायका, सहपरिवारें । सहीत बैसु- नियां यदुवीरें । सभा केली." ॥ २९ ॥ हातें उठवितां ढकलूनी । हनु- मान् ध्यान विसर्जुनि, मनीं । सावध होउनि, पाहतां नयनीं, । देखे पक्षी. ॥ ३० ॥ "सर सर परता. रे, तूं कोण ? । कृष्ण आणिला तो कोठून ? । अंतर पडलें करितां ध्यान । श्रीरामाचें." ॥ ३१ ॥ म्हणउनि सहज- स्वभावें हातें । गरुडा निवारितां हनुमंतें, । चडकण बैसुनियां जेवी तें । फुटलें त्याचें. ॥ ३२ ॥ तेणें जाउनियां चांचरी, । डोळां पडियेली अंधारी. । भयभीत होउनि गगनोदरीं । भरला पक्षी. ॥ ३३ ॥ रुधिर वाहत नाकीं तोंडीं । अवचित जाउनियां मुरकुंडी । कृष्णासन्मुख पडिली उडी; । कुंडी जैसी. ॥ ३४ ॥ कृष्णें धांवुनियां लवलाहीं । आलिंगिला दोहीं बाहीं. । म्हणे, "सखया, हें तुज कायी । केलें कवणें ?" ॥ ३५ ॥ येरू म्हणे, "पुरुषोत्तमा, । तुझा महिमा अगम्य निगमा. । कुंठित झाला शेष ब्रह्मा । वर्णूं जातां. ॥ ३६ ॥ पुच्छकेंत तो मजभवंता । कैंचा निर्मिला, हो, तां ? । त्याचें अगाध बल तत्त्वता । कळलें नव्हतें. ॥ ३७ ॥ कृष्णें बोलाविलें तुजला. । म्हणतां, हातें हाणितां मजला, । पुढें विचार कैसा झाला । तें मी नेणें." ॥ ३८ ॥ केशव म्हणे, "तुझें बल पूर्ण; । परी हा वेळेचाचि गुण. । तुझी जाणें सर्वही खुण । मी जगदात्मा. ॥ ३९ ॥ आतां ऐक एक मात. । पुनरपि जाउनियां तूं त्वरित । अनन्यभावें अंजनीसुत । नमस्कारीं. ॥ ४० ॥ 'तामरसमणिकुलभूषण, राम, । अयो- ध्याधीश, पूर्णकाम, । तो हा मुनिजनमनविश्राम । सीताकांत, ॥ ४१ ॥

लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, । बंधुसहित चौघे जण. । अठरा पद्में वानरगण । जयापाशीं, ॥ ४२ ॥ तेणें बोलाविलें तुज. । दर्शन होईल सहजीं सहज. । ऐसें बोलतां अंजनीतनुज । येईल वेगीं. ॥ ४३ ॥ तरी तूं जाईं गा, पुनरपि । आणुनि भेटवीं तो कपि. । वाट पहातसे अद्यापि । दर्शनाची. " ॥ ॥ ४४ ॥ गरुड म्हणे, "माझा भोग. । मागुती पाठवितो श्रीरंग । असो. चालिला तो, लगबग । झाली त्यासि. ॥ ४५ ॥ तेथें सिंधूच्या परिसरीं । वेगें जाउनि तो सर्पारि । अनन्यभावें नमस्कारी । हनुमंतातें. ॥ ४६ ॥ "नमो नमो, जी बलभीमा, । महारुद्र, प्लवंगमा; । रघुवीरदर्शन होईल तुम्हां । पूर्वपुण्यें. ॥ ४७ ॥ तुम्हांसि दाशरथी रघुवीरें । बोलाविलें अत्यादरें." । ऐसें ऐकोनि समीरकुमरें । नमिलें गरुडा. ॥ ४८ ॥ परस्परें अभिवंदन, । येरयेरां समाधान । रामरूपीं अनुसंधान । धरूनि ठेले. ॥ ४९ ॥ विनतात्मज । आणि बलभीम । निघाले आक्रमित व्योम, । भक्तकामकल्पद्रुम । पाहवयासि. ॥ ५० ॥ येरीकडे यदुनायकें । सत्यभामेसि कौतुकें । पाचारुनियां सविवेकें । आज्ञा केली. ॥ ५१ ॥ "दर्शन घ्यावया हनुमता । तुम्हांसि होणें लागे सीता; । आम्हीं रामरूप तत्वता । होणें लागे; ॥५२॥ समस्त यादव, वानरगण; । बळीराम तो लक्ष्मण; । द्वारकेची अयोध्या जाण । करणें आतां." ॥ ५३ ॥ सत्यभामा म्हणे, " हरि, । विलंब कापसा ? अवधारीं. । जनकात्मजा क्षणाभीतरीं । मी होईन आतां. ॥ ५४ ॥ म्हणवुनि उठोनियां लवलाहीं । प्रवेशली अंतर्गृहीं । नाहणें, धुणें, उटणें, ाहीं, । करिती झाली. ॥ ५५ ॥ नानाअलंकारलेणीं । घाली फेडी स्त्राभरणीं, । काजळकुंकूं, वेणीफणी । करिती झाली. ॥ ५६ ॥ भाज्ञा करितां वरिचेवरि । झाली लगबगा घाबरी । अभिमानाची ाती वैरी । निजभक्तांसि. ॥ ५७ ॥ भाळीं काजळ, कुंकू नयनीं, । नाकीं ाळी, मोतीं कानीं, । कंठीं कडदोरा घालूनि । दर्पण देखे. ॥ ५८ ॥ सती झाली सखियांप्रति, । "ऐसी असेल सीता सती?" । कृष्णें बोला-

वितां निगुती । बाहिर आली. ॥ ५९ ॥ अवयव दिसती अस्ताव्यस्त; । पाहती सभाजन समस्त; । हास्य करिताति नेमस्त । अधोवदनें. ॥ ६० ॥ श्रीहरि लाघवीं विंदाणीं । रूप विटंबिलें चौगुणीं । लज्जायक्षिणी झड-पणी । करूनि गेली. ॥ ६१ ॥ लाजोनियां निजमंदिरीं । गेली सत्यभामा नारी. । "विनोद मांडिला पूतनारी। " म्हणती सर्व. ॥ ६२ ॥ गर्वपरिहार जाहल्यावरि । समीप रखुमाई सुंदरी, । आदिमाया, सिंधुकुमरी । सेवा करीत. ॥ ६३ ॥ कृष्ण म्हणे, "वो रुक्मिणी, । सीता व्हावें येच क्षणीं. । सर्व सालंकृतलक्षणीं । लक्षणोक्त" ॥ ६४ ॥ आज्ञा करितां ते अवसरीं । रुक्मिणी हरिचरणांबुज धरी । म्हणे, "स्वामी, श्रीमुरारी, । आज्ञा तुमची. ॥ ६५ ॥ 'जेथें भाव, तेथें देव.' । हाचि सिद्धांचा स्वानुभव. । एक नेणती, ते अभिनव । म्हणती यासि. ॥ ६६ ॥ रुक्मिणी झाली जनका-त्मजा; । कृष्ण झाला रामराजा; । रीस वानर झाले वोजा । यादवगण ते. ॥ ६७ ॥ द्वारावती, अयोध्या नगरी । झाली त्या क्षणामाझारी. । सभा घनवटली परिवारीं । शोभा आली. ॥ ६८ ॥ तों नभपंथें अकस्मात । आले गरुड आणि हनुमंत, । रामनामस्मरणें गर्जत । पाहती दृष्टी. ॥ ६९ ॥ सुग्रीव, जाबुवंत, बिभीषण, । सीता, राम, लक्ष्मण, । अंगद, नळ, नीळ, सुषेण । हनुमान् देखे. ॥ ७० ॥ पाहतां रघुवीररूप नयनीं । हनुमान् आला लोटांगणीं; । मिठी पडली रघुवीरचरणीं । अनन्यभावें. ॥ ७१ ॥ उचलुनि श्रीरामें निजकरें । क्षेमालिंगन अति आदरें । देतां, प्रेमाच्या पडिभरें । स्फुंदन आलें. ॥ ७२ ॥ अवघ्या निजभक्तांसि क्षेम । देउनि बैस-विला बलभीम. । स्वागत पुसे राजा राम । हनुमंतासि. ॥ ७३ ॥ येरू म्हणे, "जी रघुपति, । अखंड न खंडे कल्पांतीं. । कृपादृष्टीनें संतृप्ति । होऊनि ठेली. ॥ ७४ ॥ रामरूपीं रमलें मन. । झालें निजानंदघन. । जनीं, वनीं मग जगजीवन । अवघा भासे. ॥ ७५ ॥ अंतर जाणोनियां

श्रीरामें । आज्ञा देतां, पुरुषोत्तमें, । हनुमान् चालिला सप्रेमें । अधिष्ठाना. ॥ ७६ ॥ तेव्हां सीता जनकनंदिनी । कृपे द्रवली संतोषोनी. । म्हणे "तुजऐसा त्रिभुवनीं । नाहीं भक्त. ॥ ७७ ॥ रामदूत ऐसें वचन । तुजला साजे, गा, संपूर्ण. । दास्य घडलें तुजलागून । अंजनीतनया. ॥ ७८ ॥ प्रथम सीताशुद्धिमिसें । बनकर मारुनि वनविध्वंसें । लंका जाळुनियां त्वां कैसें । कौतुक केलें ? ॥ ७९ ॥ शक्ति लागतां लक्ष्मणा, । एका रात्रीमध्यें जाणा, । द्रोणागिरि आणिला कवणा । होईल ऐसें ?॥ ८० ॥ जाउनि आणुनि, नेउनि ठेविला; । वानरदळभार वांचविला, । लोकत्रयीं पवाड केला । अवताराचा. ॥ ८१ ॥ तुझिया उपकारां उतराई । कवणें व्हावें, कैसें ? पाहीं. । काय द्यावें हें मज कांहीं । नकळे आतां." ॥ ८२ ॥ ऐसें ऐकुनियां उत्तर । काढुनि नवरत्नांचा हार । कंठीं घाली रामचंद्र । हनुमंताच्या. ॥ ८३ ॥ हनुमंत पाहे लवडसवडी । रत्नें घेउनि दशनीं फोडी; । जीं न जोडती धनकोडी । देतां एका. ॥ ८४ ॥ तें तृणतुल्य मानुनी, । हनुमान् फोडुनि टाकी अवनी. । म्हणे, "माझा रामनयनीं । न दिसे येथें. ॥ ८५ ॥ जेथें नाहीं रामस्मरण । ते केवळ, जाण, पाषाण. । काय करावे घेऊन । निजभक्तांसि ? ॥ ८६ ॥ नवविध नवरत्नांची माळा । नित्य नूतन घालुनि गळां, । अखंड भोगावा निजसोहाळा । निजभक्तांनीं." ॥ ८७ ॥ जानकी म्हणे, रे "वायूकुमरा, । अमोल्य नवरत्नांच्या हारा । फोडोनि टाकिलें अविचारा; । काय म्हणोनि ?" ॥ ८८ ॥ मारुती म्हणे, "माते, जाण. । आत्मप्राप्तीचें साधन । नव्हे म्हणवुनियां फोडून । टाकूनि देतों. ॥ ८९ ॥ अलक्षलक्षें लक्षापति । दिव्य चिद्रत्नाची ज्योति । अखंड न खडे कल्पांतीं । तेजोमय जे." ॥ ९० ॥ ऐशा स्वानुभवें मारुती । जाणोनियां सीतापति । आज्ञा देता झाला निगुती । हनुमंतासि. ॥ ९१ ॥ जयजयकारें रामस्मरणें । दुस्तर भवसागर हा तरणें, । कोटिकुळांतें उद्धरण । श्रवणमात्रें. ॥ ९२ ॥ ऐसी करूनियां गर्जना । हनुमान् बोळवितां स्वस्थाना । अष्टे

भावें भाविकजना । स्फुंदन आलें. ॥ ९३ ॥ गेला स्वस्थळासि हनुमंत. । मागें बितला जो वृतांत, । तो परिसा साधुसंत, । श्रोतेजन हो. ॥ ९४ ॥ पूर्वी होतें जैसें, तैसें । केलें सर्वहि जगन्निवासें. । याचें चोज मानावें कैसें । सर्वज्ञांनीं ? ॥ ९५ ॥ 'हरि करील, तें नव्हे काय ?' । हा मुख्य, जाणा अभिप्राय; । इच्छामात्रें मायामय । हें रचिलें जेणें. ॥ ९६ ॥ कृष्णअवतार द्वापारीं; । यादवकुळीं, द्वारकापुरीं, । सत्यसंकल्प श्रीहरि । तो करूनि दावी. ॥ ९७ ॥ भगवंत भक्तांचा साहकारी । उणें पडों नेदी तिळभरि; । गर्व परिहरूनी त्यांवरि । दया करित. ॥ ९८ ॥ दीनानाथ, दीनबंधु, । भक्तवत्सल, करुणासिंधु, । पतीतपावन, आनंदकंदु, । रंगलासे. ॥ ९९ ॥ सहजीं **सहज पूर्णरंग** । सर्व रंगीं तो निःसंग, । सच्चित्सुखमय अभंग । होउनि ठेला. ॥ १०० ॥

# रामायण.

## ( माधव. )

### बालकाण्ड.

प्रथम नमन माझें वक्रतुंडा गणेशा;
तदुपरी नमिली ते शारदा चिद्विलासा; ।
गुरुपदिं निजभावें ठेवुनी मस्तकातें,
उपरि वदत वक्ता जोडुनी हस्तकातें. ॥ १ ॥

ऐका कथा सर्वहि तापभंगा, रामायणी, अमृतसार गंगा; ।
वाल्मीकिअद्रीहुनि रामसिंधीं जे मीनली, शंकरजीस वंदी. ॥ २ ॥

शरयुनदितटीं जे नातुडे पौरयोध्यां,
म्हणउनि जन तीतें नांव बोले अयोध्या. ।
दशरथ नृप तीतें सुकृती, पुण्यराशी,
सकळिक जन पाळी सर्वदा सौख्यदेशीं. ॥ ३ ॥

एके दिनीं त्या मग थोर चिंता, । म्यां भोगिले सर्वहि भोग आतां. ॥
वार्धक्य आलें, परि पुत्र नाहीं; । यालागिं कीजे सुतयत्न कांहीं. ॥ ४ ॥

सुमंत्रातें मंत्रू पुसत नृपती, "काय करणें?"
म्हणे तो, "जी राया, सहज सुतचिंता न करणें. ।
असे प्राप्ती त्यांची, मुनिवरमुखें म्यां परिसिलें.
कथा ऐकें ते तूं; नवल ऋषिश्रृंगें सरसिलें. ॥ ५ ॥

महाराज जो धार्मिकू रोमपादू, । भुमी त्याचिये नाडळे तोयबिंदु. ॥
पुसे तो पुढें संतसाधूजनांसी । 'किजे यत्न म्यां सांगिजे, काय यासी.'॥६॥

ते सांगती जाणुनि दैवरंगा, । 'आणीं, नृपा, सत्वर एकश्रृंगा. ।
तेणें पुढें होइल मेघवृष्टी, । त्यानंतरें धान्यसुभिक्ष सृष्टी.' ॥ ७ ॥

ऐकोनि ऐसें नृप ते प्रसंगीं । बोले अमात्यां, ऋषि एकश्रृंगी ।
आणा तुम्ही यत्न करूनि नाना.' । ते पाहती निश्चयबुद्धिज्ञाना.॥ ८ ॥

उपरि कुशल वेश्या गायका आणवील्या,
कनकसुमनवस्त्रीं सर्वहीं गौरवील्या, ।

निगडुनि मग त्यांतें पाठवीलें वनासी,
नवल परम वाटे सानश्रेष्ठां जनांसि. ॥ ९ ॥

देखोनि दृष्टीं ऋषि शृंग, त्यांहीं। आळापिला मंजुळ राग कांहीं. ॥
ऐकोनि कर्णीं ऋषि शृंग आला; । साष्टांग त्यातें प्रणिपात केला. ॥ १० ॥

म्हणे, 'आपुलें नाम तें काय, सांगा.' । 'ऋषी गंडकी हेंचि हो, हाचि जागा' ॥
सुधे तुल्य अर्पूनि नाना फळांतें, । निवाल्या पुढें शीघ्र घेवोनि त्यातें.॥ ११ ॥

शांता नाम सुता सुधारसलता, लावण्यरूपी महा,
तीतें राव करीं धरूनि, उपरी अर्पी ऋषीतें पहा; ।
झाली वृष्टि बळें, द्रुमीं बहु फळें, धान्यादिकें पीकलीं,
तेणें लोकमनें सुवाससुमनें भोगावया सोकलीं. ॥ १२ ॥

"तो मित्र तूझा, तरि जाउनीयां । येईं ऋषी सत्वर घेउनीयां. ॥
त्याचेनि राया, तुज पुत्र होती; । कथा अशी पूर्विल हे वदंती." ॥ १३ ॥

अमात्याचीं ऐशीं सरस वचनें ती परिसुनी,
त्वरें गेला राजा सकळ जनचिंता निरसुनी; ।
पुढें आणी मित्रा पुसुनि नगरालागिं उभयां,
ऋषी अर्पी राया कुमरविषयीं शीघ्र अभया. ॥ १४ ॥

उपरि करुनि यज्ञ, साधिलें पायसासि,
परम सुशिल जाया, वांटिलें त्या तिघींसि. ।
समुह सकळ गेला, राव सभासि आला,
तंव सुतजननाचा काल सन्नीध आला. ॥ १५ ॥

कर्काटलग्न, नवमी, धवलीत पक्षु,
मासासि चैत्र म्हणिजे, रवि लोकचक्षु; ।
मध्यान्हकालिं, ग्रहपंचक उच्च संख्या,
तेव्हांचि जन्म घडला रघुनाथमुख्या. ॥ १६ ॥

भरत परम साधू जाहला कैकयीशीं,
कुमर उभय देखा राजमध्यस्त्रियेशीं; ।
प्रथम जनि जयाला नाम शत्रुघ्न त्याचें,
उपरि वडिल झाला शेषसामर्थ्य ज्याचें. ॥ १७ ॥

वाढले हळुहळू दिनमानें, । बांधिली उपरि मुंजि नृपानें; ॥
जाहले चतुर सर्वहि भारी, । पावला त्वरित कौशिक दारीं. ॥ १८ ॥
पुढें त्यासि सन्मानुनी राजश्रेष्ठें । सभे आणिलें नीतिवंतें वसिष्ठें, ॥
ऋषी यज्ञसिद्ध्यर्थ तो राम मागे, । नृपा अंतरीं थोर उद्वेग जागे. ॥१९॥
वसिष्ठें प्रसंगें बहु शीकवीला, । तयानंतरें दीधलें राघवांला; ।
ऋषी राम, सौमित्र घेवोनि वेगें । सुखें चालिला आश्रमाचेनि मार्गें; ॥२०॥

दशशतगजशक्ती कर्कशा ताटका ते,
निबिडवनप्रदेशीं प्राणिमात्रासि खाते; ।
नरवर धिर त्यांतें देखतां शीघ्र आली,
न भरत पळ बाणें राघवें भग्न केली. ॥ २१ ॥
उपरि मुनिवराचा याग सिद्धीस नेला,
वधुनि असुरमेळा सर्व आनंदवीला; ।
विबुध सकळ त्यांतें जाहली थोर तुष्टि,
परमहरुषमेळें सांडिली पुष्पवृष्टि. ॥ २२ ॥
मुनी बोले "रामा, परिस गुणधामा, रणधिरा,
विदेहाचे ग्रामीं कठिण धनु, जें देवअसुरां; ।
न हालेची, तें त्वां चढवुनि गुणा, भग्न करिजे,
ममाज्ञा हे, वत्सा, उभय अनुजीं दृढ धरिजे." ॥ २३ ॥

"हो जी" म्हणे राम, "चला" मुनींद्रा, । तो चालिला घेउनि रामचंद्रा. ॥
पथीं अहल्या मग उद्धरीली । पूजा तिणें सर्वहि सांग केली. ॥ २४ ॥
नगर तेथुनियां जनकाचें । सरस पाहुनियां कनकाचें, ॥
उपरि घेउनियां नृपभेटी, । सबळ आणविलें धनु पाठीं. ॥ २५ ॥

देखूनि चाप उठिला रघुराज कैसा ?
देदीप्यमान अवनीप्रति सूर्य जैसा ।
झेली पुढें अवलिळा कुसुमापरी तें;
तोलोनियां चढवितां दृढ गूण, हो तें ॥ २६ ॥
कडकड धनु मोडे, वोढितां सीत नेटें,
धडधड भुमि तेणें लोटलीं शैलथाटें; ।

तडतड अवनीं तैं चेवल्या व्योमतारा,
धडधड अतिनादें लोक मूर्च्छीत सारा. ॥ २७ ॥

जनक परम तोषें कौशिकाचे निमित्तें,
दशरथनृपनाथा पाठवी पत्रिकेतें; ।
"दिनमणिकुलदीपा, प्रार्थने आयिकावें,
सदळ, सपरिवारें शीघ्र लग्नासि यावें." ॥ २८ ॥

वाचोनि पत्र स्वमनीं नरराज कैसा
तोषे: बहू उदधि देखुनि चंद्र जैसा. ।
पाळणवी मग दळाप्रति शीघ्र काळें,
बैसे त्वरें निजरथीं अतिसौख्यमेळें. ॥ २९ ॥

रथ, गज, नर, वाजी दाटणी थोर जाली,
उधळत रज व्योमीं, श्वापदें सर्व भ्यालीं. ।
बहुविधवरि छत्रें, नाडळे सूर्यरेखा,
फडफडफड वातें वाजती त्या पताका. ॥ ३० ॥

भेरी, नफेरी, बहुसाल रंगें । वाद्यें बहू वाजति तैं सुरंगें; ।
टाळा, दुटाळा, पणवें, बुरंगें । ऐकोनि कर्णें पळती कुरंगें. ॥ ३१ ॥

जनकनृपवरासी सर्वदा वस्ति जेथें,
क्रमुनि दिवस कांहीं पावले भार तेथें. ।
निजदळपरिवारें राव सन्मूख आला,
दशरथ बहुमानें पट्टणामाजि नेला. ॥ ३२ ॥

हयगजरथशाळा, उंच माड्या विशाळा;
निरज करुनि भूमी, रेखिल्या रंगमाळा. ।
मखरशिखरदुर्गीं तोरणें ठायिं ठायिं;
नगर परम शोभे, साम्यता ज्यासि नाहीं. ॥ ३३ ॥

दशरथनृपनाथा ठाव देवोनि वस्ती,
जनक त्वरित गेला, अस्त होतां गभस्ती. ।
उपरि सहज झाला शार्वरीलागिं अस्तु.
भरतसुहृद आला वीर संग्रामजीतु. ॥ ३४ ॥

विवाहाचीं अंगें सकळ करुनी सिद्ध बरवीं,
विदेही भृत्यांचें सरळ वचनें चित्त निरवी. ।
" तुम्ही जा, हो; आणा दशरथनृपालागिं सदना. "
त्वरें गेले कैसे जळनिधिप्रती तोय वहना. ॥ ३५ ॥

करुनियां नमना निजमस्तकें, । सकळ बोलति जोडुनि हस्तकें. ।
"करुनि सिद्ध स्वसैन्य त्वरें चला, । निजस्नुषा स्वकरें मग ऊचला." ॥ ३६ ॥

ऐकूनि भृत्यवचनें नृप सिद्ध झाला,
सेनासमूहसरिसा गजरें निघाला. ।
हस्ती पुढें सरस चालति थोर मस्ती;
वाणी वदे द्विजमुखीं सकळांसि स्वस्ति. ॥ ३७ ॥

हयगजरथदाटें चालिलीं कड्कडाटें,
नरविरधिर नेटें, भाट, वेताळ थाटें. ।
' थिर, थिर, थिर ' शब्दें बोलती एकमेकां.
गजबज अतिखेटा, ठायिं ठायीं पताका. ॥ ३८ ॥

शतदशशतसंख्या शोभती पालखत्रें,
बहुविध बहुछत्रें आणि तीं सूर्यपत्रें; ।
धडधडधड भेरीवाद्यकल्लोळ वाजे,
बधिर सकळ तेणें वाड ब्रह्मांड गाजे. ॥ ३९ ॥

कर्णे, तुतारे बहुसाल बांके, । घोषें महा अद्भुत व्योम झांके. ।
टाळा, दुटाळा, पणवें, बुरंगें, । नानापरी वाजति ती सुरंगें. ॥ ४० ॥

सरसर फुलबाज्या; शोभती चंद्रजोती; ।
लखलख दिवट्यांचे भार ऊदंड येती. ।
झकझकति चुचुंद्र्या, दाटणीं सोडितातीं. ।
टकमक जन तेणें तोषती आणि भीती. ॥ ४१ ॥

नळे, हवाया अति उंच पाहीं । व्योमांत जाती, मिति त्यांस नाहीं. ।
उसंत रंगीं क्षणही दिसेना; । येणें रिती चालत सर्व सेना. ॥ ४२ ॥

मिरवत जनकाच्या मंदिरालागिं आले;
उतरुनि मग भूमी भीतरीं सर्व गेले. ।

मुनिवरद्विजसंघीं सांडिला वेदघोषु,
लखलख दिपिकांचा ठायिं ठायीं प्रकाशु. ॥ ४३ ॥

डाळिंब, धात्रीफळ आणि केळें, । द्राक्षें, तथा आणिकही रसाळें; ।
फळें महा लोंबति ठायि ठायीं, । घेती मुलें तोडुनि कांहीं कांहीं; ॥४४॥

सरमस वनितांची आणि त्या हो नरांची,
सकळिक म्हणती कीं "वेळ हे अमृताची. ।
समय निकट झाला; शीघ्र कन्येसि आणा,"
जनक त्वरित गेला मंदिरामाजि, जाणा. ॥ ४५ ॥

मग गजवरगामी राम तीतें अपेक्षी,
प्रथम अवनिजा ते आणिली पंकजाक्षी; ।
अगणितगुणसीमा कोण वर्णील वाचे ?
फणिवर, कविंचेही जाहले शब्द कांचे. ॥ ४६ ॥

अमृतउदधिकन्या, रामरूपीं अनन्या,
मुनिवरऋषिमान्या, शीललावण्यधन्या, ।
दनुजअसुरशून्यालागिं निर्माण, अन्यां,
सुखकर, सुखजन्या, स्थान जें मूळ पुण्या. ॥ ४७ ॥

लावण्यराशी, अति सौख्यराशी, । लीलाविशेषी, चिदचिद्विलासी, ।
पापघ्न गंगा, भवतापभंगा, । विश्वांतरंगा, सुललीतरंगा. ॥ ४८ ॥

घेवोनि तीतें, मग वेदिकेतें । आला विदेही, रघुनाथ जेथें, ।
घालोनि मध्यें मग अंतपाटा, । आरंभिलें मंगळ मंगळाष्टा. ॥ ४९ ॥

आधीं मत्स्य जळीं रिघे अतिबळी, शंखासि मारी पहा,
झाला कूर्म पुढें, बळें निजरदें राखे महीतें महा. ।
वाराहस्वरुपें महातमरुपी हेमाक्षनामा वधी,
तो हा राम सुश्याम, कामजनिता, कूर्यात्सदा मंगलम्. ॥ ५० ॥

झाला सिंहनरू, तथा द्विजवररूपें कसा वामनू,
केली ख्याति तिहीं जगीं अति मही स्थापावया हा जनू; ।
झाला राम सुखें, शरें अति तिखें संहारिलें क्षत्रियां,
तो हा राम सुश्याम कामजनिता, कुर्यात्सदा मंगलम्. ॥ ५१ ॥

आतां राम, पुढें महा जडमुढें तारावयातें जनीं,
बोधूं बौद्धमुनी, हयानन गुणी मांदावया सज्जनीं; ।
मारूं दुष्ट जिवां, करी जन नवा कल्की तया बोलिजे;
तो हा राम सुश्याम कामजनिता, कुर्यात्सदा मंगलम्. ॥ ५२ ॥

समय अति पहाला, पट्ट तो काढियेला,
वधुवर उभयातें अक्षतायोग झाला. ।
लघु गुरु बहु वाद्यें लागलीं एक घाई.
पिटिति सकळ टाळी पार सौख्यासि नाहीं. ॥ ५३ ॥

विबुधजन विमानीं, जाहली त्यांसि तुष्टि,
रघुपतिवरि तेहीं मांडिली पुष्पवृष्टि, ।
सुखमय, सुखपुष्टी कोंदली सर्व सृष्टि,
वधुवरसमरूपीं गुंतली लोकदृष्टि. ॥ ५४ ॥

रघुपतिभरतांची पाहतां एक लीला,
टकमक जन पाहे भ्रांतिनें वेळवेळां. ।
कुमर उभय जे कां राजमध्यस्त्रियेचे
समरुप, समठाणीं, वीरसिंधू नितीचे ॥ ५५ ॥

त्यानंतरें सत्वर तुष्टचित्तें । अर्पी फणीतें नृप उर्मिळेतें. ।
चक्राक्ताराप्रति मांडवीतें, । शत्रुघ्न जो त्या श्रुतकीर्तिकेतें. ॥ ५६ ॥

रसमससुखशब्दीं लोटली वेळ कांहीं,
बहुविध वनितांनीं निर्मिले पाक गेहीं. ।
करुनि सकल स्नाना, बैसले भव्य हारीं,
उजळिति दिवरत्नीं रंग नाना प्रकारीं. ॥ ५७ ॥

विविध लवणशाका, इच्छिने देवमुख्यें;
वटक सरस धान्या, आणिकें भिन्न भक्ष्यें; ।
तळण, वळण, मांडे भव्य पूऱ्या अनेका,
रुचिकर अति अन्नें वाढिलीं आणि शाका. ॥ ५८ ॥

घळघळ घृत द्रोणीं ओतिलें सर्व पात्रीं,
नृपवर मग सोडी तोय संकल्पमंत्रीं. ।

करुनि उपरि वेगें पूर्वआपोशनातें, ।
सकलिक जन घेती पांच प्राणाहुतींतें. ॥ ५९ ॥

मघमघ बहु अन्नें सेवितां भक्ष्य धाले,
जलदधिपयतर्कें सर्व निर्हेत केले. ।
त्यजुनि कचित पात्रीं अन्न ते ऊठियेले,
रघुविरस्मरणेंसीं सर्व बाहेर आले. ॥ ६० ॥

त्यानंतरें आंचवले खळाळा, । आले सभे सर्वहि एकवेळा. ।
वैडुर्यपाची बहुरंग फांके, । सुरत्नदीपीं रवितेज झांके. ॥ ६१ ॥

दिव्यासनीं सर्वही स्थीर झाले, । सुगंधपुष्पीं मग पूजियेले. ।
माळा गळां घालुनियां, विदेही । अर्पी धना, तोषवि आप्त, व्याही.॥६२॥

येणेंपरी आदर दीन चारी । केला विदेहें बहुतां प्रकारीं. ।
जामात चौघे अति सौख्यराशी, । अर्पी तयां कांचनदासदासी. ॥ ६३ ॥

घेऊनि आज्ञा रथसप्ततीनीं । निघे स्वपौरा, मिथिलेशपत्नी, ।
प्रार्थी मुखें येउनि राममाते । "पाळा स्वपुत्रांपरि कन्यकांतें." ॥ ६४ ॥

पुसुनि परम स्नेहें एकमेकांसि, देखा,
दशरथ नृप जातां पट्टणा, मार्गरोखा ।
धरुनि, उदित युद्धा भार्गवी राम कोपें,
रघुपति मग त्याची शक्ति शोखी प्रतापें. ॥ ६५ ॥

आले सर्व पुरीं, समस्त नगरी श्रृंगारिली साजिरी,
राजाज्ञा स्वशिरीं धरोनि, उपरी संग्रामजीतू करीं ।
भर्तालागिं धरोनि, घे झडकरी शत्रुघ्नही केसरी,
संगें सौख्य वरी, स्वराष्ट्रकुसरी तो पावला मंदिरीं. ॥ ६६ ॥

दशरथ निजनीती राघवालागिं सांगे,
रघुपतिगुणरंगें सर्वही लोक रंगे. ।
हरि निजकांता बाळकांडासि झाली.
विनवित गुरुआज्ञे माधवु स्वल्प बोलीं. ॥ ६७ ॥

इति श्रीमाधवस्वामिकृते रामायणे बाळकांड: ।

---

# अयोध्याकाण्ड.

गणपतिविधिकन्यासद्गुरूनाथजींसि
नमन करुनि, वक्ता सांगताहे कथेसि. ।
दशरथसुत दोघे मातुळालागिं गेले,
रघुपतिगुणवेधें लोक निश्चीत ठेले. १.

जलधरजलपानें चातका तृप्ति पोटीं,
हिमकरउदयेंही त्या चकोरासि मोठी; ।
रघुवर निजदृष्टी देखतां लोक तैसे,
निशिदिनिं स्मरणेंची लोटिती काळ ऐसे. २.

" रामा, रामा " पट्टणीं शब्द हाचि.
जेथें तेथें लोक कामा न वांच्छी. ।
वाचा चिंती सर्वदा रामसौख्या;
सौख्या त्यांच्या पार नाहीं असंख्या. ३

दशरथ नृप ऐसें जाणुनी सर्व चित्तें,
पुसत सुहृद जे कां त्यांप्रती नीतिपंथें. ।
रघुवर, सुत त्यातें इच्छितों राज्य द्याया.
विवरुनि मज सांगा याचि अर्थीं उपाया. " ४

ते बोलती होउनि एकमुष्टी, । " हे मान्य, राया, अतिसार गोष्टी.
ज्याच्या गुणांतें परपार नाहीं, । ज्याला न भूमी उपमाचि कांहीं. ५.

उदयिक युवराज्यीं स्थापिजे राघवासि,
सुखकर अमुची हे पूर्ण कीजे असोशी. " ।
नृपवर मग प्रार्थी कार्यहेतें वसिष्ठा,
विधिसुत करि आज्ञा भृत्यवर्गा वरिष्ठा. ६.

न भरत पळ तेंहीं कार्य सिद्धीस नेलें.
सकळिक पुर रंगें रम्य शृंगारवीलें. ।
हरि हरि निजगेहीं रेखिल्या चित्रशाळा,
निरज करुनि भूमी काढिल्या रंगमाळा. ७.

तरु बहु कदलीचे बांधिले ठायिं ठायीं.
मखरशिखरउंचीं तोरणां मीति नाहीं. ।
रसमस अति गांवीं, थोर संतोष लोकां,
अगणित रविपत्रें, ठायिं ठायीं पताका. ८.

दशरथनृपनाथालागिं तैं ब्रह्मवेत्ता,
करवित श्रुत वाक्यें पट्टणाच्या वृतांता. ।
निरखुनि रघुनाथा बोलता राव झाला;
सकळिक तुम्हि ऐका त्याचि सारांश बोला. ९.

“ लावण्यनेत्रा, रमणीयगात्रा, । सीताकलत्रा, नरराजछत्रा,
विद्याविचित्रा, सुगुणा, पवित्रा, । ऐकें, सुपुत्रा, जनमातृमित्रा ! १०.

अगणित सुख, पाहीं, भोगिलें सर्व देहीं.
निशिदिनिं मनिं चिंता राहिली एक पाहीं: ।
तुजप्रति युवराज्यीं स्थापणें लागवेगें;
समय कठिण मातें मृत्यु सांगे प्रसंगें. ११.

थरथरथर गात्रें कांपती वेळवेळां,
तगमग निजचित्तीं लक्षितां व्योम डोळां. ।
रविशशि दिनराती तेज निस्तेज भासे,
अतिहित दिसती कीं अंतरीं दुःख पैसे. १२.

उदयिक युवराज्यीं तूज देखेन जेव्हां,
सुफलित मग हेतू ; सिद्ध संकल्प तेव्हां. ।
तरि तुज निजनीती सांगतों ऐक, रामा.
क्षणभरि मन घालीं, सौख्यलावण्यधामा. १३.

बहु शांत होई, अति धीर होई, । विजयीच होई, अजयी न होई.
ममता वसों दे, समता दिसों दे, । छळणा रुसों दे, तुळणा नसों दे. १४.

हे गूण अस्ती, तरि सर्व स्वस्ति; । त्यातें समस्तीं नमिजे स्वहस्तीं.
जो मूढ व्यस्ती करि फार मस्ती, । तो काळगस्तीप्रति प्राप्तवस्ती. १५.

याकारणें जाउनि मंदिरासि । विध्युक्त वर्तें, अतिसौख्यराशी,
घेऊनि सेना बळ सिद्ध कीजे. । आलस्य येथें सहसा न कीजे." १६.

" हो, जी " म्हणे राम. पुढें नृपाळा । वंदोनि सद्माप्रति शीघ्र गेला.
तों मंथरा कैकयिज्ञातिदासी, । आश्चर्य करपे बहुसाल तीसि. १७.

गजबज नगरीं हो आजि कां होत आहे,
म्हणउनि मग उंचीं शीघ्र वेंघोनि पाहे. ।
सकळिक जन बोले राज्य रामासि व्हावें,
परिसुनि झणिं कुब्जा तप्त देहीं स्वभावें. १८.

उतरुनि मग शुद्धी कैकयीलागिं सांगे,
तुजप्रति भय आलें नेणसी काय मार्गें. ।
रघुपतिनिजहस्तीं लाभतें राज्य, मूढे,
म्हणउनि मम चित्तीं शोक अत्यंत वाढे. १९.

म्हणे कैकयी, " मंथरे, ऐक वाणी; । सुताहूनियां राम लावण्यखाणी
मनीं आवडे. त्याचिया सौख्यहेतें । समर्पीतसें तूज मी कंकणातें. २०.

रघुपति निजभद्रीं बैसल्या आणिं वार्ता;
करिन सकळ तेव्हां मान मी तूज पूर्ता." ।
प्रतिकुळ अति शब्दां ऐकतां पापराशी,
कटकट करि, बोले मंथरा कैकयीसि. २१.

बहुविध हिन शब्दें भेद दावोनि तीतें
शिकवित, रघुनाथा शीघ्र धाडी वनातें. ।
"उदयिक तववाक्यासारिखें, मंथरे, मी,
करिन;" म्हणुनि बोले कैकयी पुत्रकामी. २२.

येरीकडे तो नृप चक्रवर्ती, । श्रीरामराज्यागम प्रीति आर्ती
सांगावया कैकयिलागिं पूर्ती । निघे त्वरें सात्विक, पुण्यमूर्ती. २३.

न धरत धिर पोटीं, कैकयीच्या गृहासि
नृपवर मग आला. रम्य, लावण्यराशी ।

न दिसत निजनेत्रीं; घाबिरा फार झाला;
तदुपरि अतिवेगें पुष्पशाळेसि गेला. २४.

तैं कैकयी लोळत भूमिपाठीं; । झाली असे वेष्टितमुक्तदाटी.
देखोनि दृष्टी नृप लागवेगें । धरोनि हस्तीं वसवी प्रसंगें. २५.

विनवित मग रावो. " सांग, वो, काय झालें.
तव निजवदनींचें तेज लोपोनि गेलें. ।
तरि मज गुज सांगें. कोणता हेत आहे ?
करिन सफळ तो मी राघवाचाण, पाहें." २६.

घेवोनि भाक बरवी, मग राजपत्नी
मागे पुढें नृपवरा वर दोनि यत्नीं. ।
" जे दीधले प्रथम ते मनिं इच्छितें मी;
नेंदा तरी त्यजिन प्राणचि याचि धामीं. २७.

प्रथम वरः नरेंद्रा, राज्य पुत्रासि द्यावें.
द्वितिय वरः अटव्या राघवा पाठवावें. " ।
परिसुनि नृपनाथा मूर्च्छना घोर आली.
निजसुतहितचिंता पावती वृद्धि झाली. २८.

त्यानंतरें सांवरुनी वपूतें । प्रार्थी बहू सादर कैकयीतें.
लागे, अती भाकुनि दैन्य, पायां. । ते नायिके पापमती उपाया. २९.

करी प्रार्थना मागुती वल्लभेशीं. । म्हणे, " आयिकें वाक्य, लावण्यराशी.
बरें साधिलें राज्य तें राघवासि. । त्वरें अर्पि तूं, कीर्ति फांकेल देशीं." ३०.

म्हणे कैकयी. " सर्वथा हें घडेना. । तुम्ही इच्छितां पल्लवीं तें पडेना.
तपस्वीरुपें राम जाईल जेव्हां, । मनू स्वस्थ होईल हा सत्य तेव्हां. ३१.

कदा नातुडें तूमच्या मी उपायीं. । रहा ऊगले सर्व सांडोनि घाई. "
घडे वाक्य ऐकोनि राजा उताणा. । "अहाहा ! अहाहा !!" म्हणे दैन्यवाणा. ३२.

" अहो, पाहा कैसें नवल ! " नृपती तैं म्हणतसे.
" नव्हे, हो, हे रात्री; कठिण शिवणा हा गेमतसे. " ।

पडे मूर्च्छामोहें विकल अवनी तो घडिघडी.
रडे, श्वासें दाटे उदर, अति चिंते तडतडी. ३३.

निशी गेली ऐशी, उपरि तरणी तो उगवला.
गुरूआज्ञा सांगे सचिव स्वमुखें, हो, नृपतिला. ।
म्हणे, "हां, जी राया, समय घटिका हे अति बरी.
त्वरें द्या, जी, रामा सकळ अवनीराज्य स्वकरीं." ३४.

राजा म्हणे, "मी तव वाक्यबाणें । विदारलों तें रघुनाथ जाणे."
ऐकोनि तें वाक्य उगाचि ठेला. । चिंतार्णवीं राव निमग्न झाला. ३५.

म्हणे कैकयी, "ऐक धीरा, सुमंता. । सुताच्या हितें राजयालागिं चिंता.
निशी जागतां, जागतां सर्व गेली;" । म्हणोनी असें बोलिली तीव्र बोलीं. ३६.

"न भरत पळ आतां राघवालागिं आणीं.
नृपवरनिजआज्ञाभेद कांहीं न मानीं. ।
समय रसिक जातो, निर्वणें राज्य आहे.
बहुविध अभिषेका सिद्ध सामग्रि, पाहें." ३७.

ऐकोनि मंत्री हरुषें निघाला. । श्रीरामगेहाप्रति शीघ्र आला.
"चला" म्हणे "सत्वर, रामचंद्रा. । बहूत वेळा सरते, नरेंद्रा." ३८.

रथीं बैसला राम तैं लागवेगें. । फणी जाणवी सर्व सेवा प्रसंगें.
असंभाव्य त्या लागल्या शंखभेरी. । महावीर वेष्टीत चौफेर भारी. ३९.

मिरवत निजभारें राव उद्विग्न जेथें
रघुवर मग गेला आदरें शीघ्र तेथें. ।
नृपवर नमुनीयां, कैकयीलागिं सेवी.
दशरथ महि लक्षी, दुःख अत्यंत भावी. ४०.

घळघळघळ नेत्रीं जातसे उष्ण वारी.
रघुपति मग मातेलागिं सर्वें विचारी. ।
"निरखुनि मज डोळां राव संतोष पावे.
विपरित तरि आजी कासया हें स्वभावें ? ४१.

अनुज भरत माझा स्वस्थ कीं? क्षेम त्यासि ?
त्रयशत नृपजाया सर्व लावण्यराशी, ।
कुशल सकल त्या कीं ? नातरी कासयासि
म्हणउनि नृप चिंता वाहताहे मनेंसीं ? ” ४२.

म्हणे कैकयी, “ सर्वही स्वस्थ, रामा.
गुण तूझिया काळजी सार्वभौमा. ।
जरी मानिशी वाक्य चित्तीं पित्याचें,
तरी सर्व जाईल हें दुःख त्याचें. ” ४३.

वदे राम तो, “ सौख्य रायासि जेणें,
मला वर्तणें जाग तेणेंप्रमाणें. ।
द्विभाषी नव्हें, बोलतों सत्यवाचा;
तरी हेत तो सांग, अंबे, नृपाचा. ” ४४.

म्हणे कैकयी, “ ऐक, गा सत्वराशी. । पती गोंविला दों वरें भाषणासि.
सुता माझिया सर्वही राज्य द्यावें; । वरू दूसरा, त्वां वनालागिं जावें. ४५.

जरी शीघ्र जाशील आतांचि वेगीं, । तरी राव संतुष्ट तो अंतरंगीं. ”
पडे वाक्य ऐकोनि मूर्च्छीत राजा. । तया बैसवी आसनीं राम वोजा. ४६.

म्हणे राम, “ मी इच्छितों राजआज्ञा. ”
वदे कैकयी, “ ऐक तूं सर्व सुज्ञा. ।
तुसीं बोलिलें वाक्य तेंची नृपाचें;
न मानी कदा अंतरीं भिन्न साचें. ४७.

तरि निजनगरातें शीघ्र त्यागूनि जाई. ”
रघुवर विनवीता जाहला तीस पाहीं. ।
पुसुनि त्वरित येतों अंबिके आणि सीते;
तंववरि स्थिर राहें, धीर कल्पूनि, माते. ” ४८.

झडकरि रघुरावो चालिला लक्ष्मणेंसीं,
नवल परम वाटे पौरवासी जनांसि. ।

मिरवित निजभारें राजभेटीस गेला.
त्यजुनि रथ, पदाती कासयालागिं आला ? ४९.

"हाहा ! हाहा !!" शब्द तो लोक बोले. । ऐके, भूमी राम लक्षोनि चाले.
गेला जेथें माय जे पुण्यखाणी. । वंदी तीतें राम जोडोनि पाणी. ५०.

न धरत धिर माता भेटली राघवासि,
कवळुनि उदरीं, ते बोलिली वाक्य ऐशी. ।
" सगर, नहुष पूर्वी जाहले थोर वंशीं;
तदनुगुण करीं, गा, राज्य तूं सौख्यराशी. ५१.

धरितिल तव मूर्ध्नी श्वेत, लावण्य छत्रां,
निरखिन सुखवेळा आजि नेत्रीं, सुपुत्रा. ।
बहुविध क्षणि वाद्यें थोर होईल घाई.
परम हरुष, माझ्या पार सौख्यासि नाहीं. ५२.

प्रतिदिनिं सुख, पुत्रा, सांगसी सर्व मातें.
न वदसि, उगलाची आजि कां दैन्यचित्तें ? ।
मुख अति सुकलें, बा, लागली भूक पोटीं ?
क्षणभरि स्थिर बैसें; अन्न वाढीन ताटीं. " ५३.

ऐकोनि राम विनवी, " परिपूर्ण आतां,
स्नेहासि राखिं, जननी. मजला दिगंता। ।
जाणें असे. प्रतिदिनीं फळहार कीजे;
मिष्टान्न रम्य मज हें सहसा न साजे. ५४.

चीरांबरी, जटिल, तापस, भस्म आंगीं,
जाईन शीघ्र विपिनाप्रति ये प्रसंगीं. ।
राज्यासनीं भरत, सर्वहि राज्य त्याचें. "
साकल्य राम सुचवी जननीस साचें. ५५.

ऐकोनि ऐशी निजपुत्रवाणी । लोटे धरेतें नृपपट्टराणी.
करी पुढें सावध राम तीतें; । बोले करें आंवळुनी सुतातें. ५६.

" रामा, कशी हे विपरीत वेळा! । तुझेनि सौख्यें अति सौख्य डोळां
पाहेन, ऐसें मनिं आर्त होतें; । तों मांडला, बा, वनवास तूतें. ५७.

हे दुःखवार्ता श्रवणीं विषाची; । शरीर माझें शतधा नव्हेची!
विवोनि तूतें अति दुःख भोगीं, । याहूनि वंध्यापण ये प्रसंगीं. ५८.

पिता जसा तो, जननी तशी ही. । यालागिं मी सांगत नीति, पाहीं.
राहें सुखें मानुनि वाक्य माझें. । देखेन मी आनन नित्य तूझें. ५९.

त्यजुनि मज, वनासी, राघवा, शीघ्र जासी,
तरि त्यजिन वपूसी, जाण हें निश्चयेसीं. ।
म्हणउनि अनमानालागिं त्यागोनि, संगें
मजहि त्वरित नेईं काननासी, प्रसंगें." ६०.

रघुपति मग बोले, " सर्वथा त्वां न यावें.
दशरथ पति त्यातें नित्य सेवीत जावें. ।
पतिविण वनितेनें इच्छिणें पुत्रवांछा,
अनुचित; न मिळे हे धर्मशास्त्रीं उपेक्षा." ६१.

फणिवर उभयांची मात ऐकोनि ऐशी,
न धरत धिर पोटीं, कोपला कोपराशी. ।
उपरि वदत दोघां लक्ष्मुनी घोर वाणी.
" त्यजुनि नगर जाणें, हेचि प्रत्यक्ष हानी. ६२,

श्रीरामबुद्धी मजला न माने. । येणें मनीं सौख्य कदा न बाणे.
ते कैकयी कोठिल, कोण? चोर. । पुत्रासि ज्येष्ठा नगराधिकार. ६३.

दशरथनृपनाथू जाहला बुद्धिमंदु.
सकलिकसुखकंदू, राम लावण्यइंदु, ।
न धरित भय, यातें पाठवीतो वनातें.
न भरत पळ आतां सांगतों बुद्धि त्यातें. ६४.

कारागृहीं घालुनि त्या अशक्तां, । संहारितों सर्वहि वीरशक्तां.
साधूनि देतों निजराज्य रामा. । निर्माण माझे कर याचि कामा." ६५.

म्हणे राम, "हें सर्वथाही घडेना. । रवीमंडळीं काळिमा ते जडेना,
तसा मी कसा आपुलें वाक्य टाळूं ? । पडो हे तनू, हाचि साधूनि काळु." ६६.

म्हणे अंबिका, "राघवा, शोकवींतां । मना नाणिशी बुद्धि कांहींच, ताता.
वनालागिं जाईन हा ध्यास चित्तीं. । जिवीं माझिया वाटते थोर खंती. ६७.

तुला कौशिकें अस्त्रअभ्यास केला. । बहुसाल तां लोक संतुष्टवीला.
यथा पितृभक्ती, तथा मातृभक्ती, । तरी तें तुतें पुण्य राखो दिगंतीं. ६८.

रक्षो सुरेंद्रू, सरिता, फणींद्रू. । रक्षो नगेंद्रू, पतगाधिपेंद्रू.
रक्षो समुद्रू, गण वीरभद्रू, । रक्षो सुचंद्रू, रविमुख्य रुद्रू. ६९.

रक्षो विधाता, मुनि सिद्धिदाता, । रक्षो तरू, राक्षस, भूत, ताता.
रक्षो पिशाचादिक आणि मुंगी. । रक्षो अळी, कीटक, काष्ठभृंगी. ७०.

रक्षो वराहो तुजलागिं वारी. । रक्षो स्थलीं वामन ब्रह्मचारी.
रक्षो वनीं कश्यप हेमवैरी. । सर्वा स्थलीं केशव निर्विकारी. ७१.

ऐकें, रवी, प्रार्थनवाक्य माझें. । रामा न बाधीं अतिउष्ण तेजें.
वा रे, समीरा, मम प्राणपुत्रा । रजें न डौरी मम प्रीतिपात्रा. ७२.

ऐकें विनंती तुज, आपमूर्ति, । रामासि रक्षीं अतिवाड कीर्ती.
ऐकें, रसे, राघववस्ति जेथें, । त्वां नम्र व्हावें बहुसाल तेथें." ७३.

निरवुनि सकळांतें राघवालागिं, पाहे,
घळघळघळ नेत्रीं तोय अत्यंत वाहे. ।
वळुनि मन विवेकें मागुती बोलताहे.
"करिसि गमन कैसें ? थोर आश्चर्य, बा, हें! ७४.

रामा, कशीं सेविसि कंदमूलें ? । रामा, कशीं नेससि चीरचेलें ?
रामा, कशी वाहसि योगमुद्रा ? । रामा, कशी साहसि भूमि निद्रा ? ७५.

रामा, कसा आंवरिसी क्षुधेतें ? । रामा, कसा लोटिसि काळ तेथें ?
रामा, कसा चालसि घोर वाटे, । जेथें बहू कंटकही सराटे ? ७६.

रामा, तूतें सेविती दासदासी; । देसी गेहीं भोजनें दिव्य त्यांसि.
रामा, तूला कोठुनी दैन्य आलें ? । रामा, अदृष्टें विपरीत केलें!" ७७.

रघुपति मग बोले, "त्यागिं तूं दूरि दुःखा.
ऋमुनि त्वरित येतों काननीं काळलेखा." ।
म्हणुनि नमुनि तीतें चालिला स्वालयासि,
तंव निकट स्वजाया पावली सत्वराशी. ७८.

बोले सीता, "आजि कां छत्र नाहीं ? । नाहीं सेना, यान, आलेति पायीं."
सांगें तीतें सर्वही राम वार्ता. । "राहें तूं तों धर्म राखोनि पूर्ता." ७९.

म्हणे जानकी, "सर्वथा ही न राहे. । वियोगू वडीमात्र तूझा न साहे."
तदा शीकवी राम कीं फार तीला. । पुढें प्रीतिचा कोप सीतेसि आला. ८०.

वदत "नवल!" सीता राघवालागिं ऐसें;
"दिससि पुरुष रूपें; देह लावण्य कैसें ? ।
भय बहु वनितांतें, अंतरीं तेंवि होसी,
जनकनृपपरीक्षा; काय बोलों तयासि ? ८१.

कां वागवीसी शरचाप वोझें ?" । ऐकोनि हांसे रघुनाथ. "भाजे,
शोधावया, वो, तव चित्त, सीते, । मी बोलिलों केवळ, पापभीते. ८२.

त्यजुनि सकल चिंता शीघ्र येईं वनासि."
तंव फणि विनवीता जाहला राघवासि. ।
"करिन सकल सेवा नित्य मी भक्तिरंगें;
तरि मज, रघुनाथा, नेइंजे शीघ्र संगें." ८३.

बहु प्रार्थितां बोळला रामराणा. । तयानंतरें सारिलें द्रव्यदाना.
त्रिवर्गे पुढें पावली राव जेथें, । मिळाल्या वधू सर्वही आप्त तेथें. ८४.

पुसे राम तो भूपतीलागिं आज्ञा. । म्हणे राव, "ऐकें सुतां मुख्य सुज्ञा.
असें गुंतली भाष, तेणेंचि आतां । नये राहवीतां; करूं काय, ताता ? ८५.

तरी घालिं वेगीं मला बंदिशाळे. । पुढें राज्यभोगीं सुखाचेनि मेळें.
महासौख्य वाणेल तेणें स्वचित्तीं." । "न मंगीं" म्हणे राम, "आत्मीय वृत्ती." ८६.

वना जावया शीघ्र दीजे निरोपा. " । वदे कैकयी, " कासया वेळ, बापा,
वृथा लाविशी? तें नव्हे योग्य तूतें." । म्हणोनी करीं दीधलें वल्कलांतें. ८७.

तयानंतरें रामसौमित्र कैसे, । रुपें जाहले तापसी शुद्ध तैसे.
न ये वल्कलें नेसतां जानकीला. । रघूनायकें नेसवीलें तियेला. ८८.

तपस्वीरुपी देखुनी राघवातें । पडे राव भूमी, जसा वृक्ष वातें.
म्हणे, " राघवा, आजिची रात्रि कंठीं; । तरी सौख्य बाणेल तेणेंचि पोटीं. ८९.

अहा कर्मरेखा कशी भीम माझी! । नव्हे सर्वथा, बा, पुढें भेटि तूझी;
तरी स्वस्थ पाहेन मी श्रीमुखातें. " । म्हणोनी धरे लोटला राव तेथें. ९०.

बहू लोक धि:कारिती कैकयीला; । परि नायिके त्यांचिया अल्प बोला.
स्त्रिया रूदती सर्वही एक वेळां. । 'अहा' शद्ब उच्चारिता लोक झाला. ९१.

ध्वनी माजला वाड आक्रांतघोषें. । पुढें मूर्च्छना सेविली त्या नरेशें.
म्हणे, " राघवा, सांगतां बुद्धि नाना । मना नाणिसी, सत्वराशी, निधाना; ९२.

तरी सर्वदा क्षेम लाभो दिगंतीं. । महा संकटां दुस्तरांलागिं जितीं.
सुमंत्रा, रथू शीघ्रता सिद्ध कीजे. । बहू हेमवस्त्रीं सिता गौरवीजे." ९३.

पुसे राम सर्वांसि स्नेहें निवाडें. । तयाचेपरी वीर सौमित्र कोडें.
नृपालागिं सेवोनि साष्टांग पाहीं । त्रिवर्गें रथीं बैसलीं थोर मोहीं. ९४.

घडघड रथ चाले; धांवती लोक मागें.
दशरथ परिवारें येतसे दुःखरंगें. ।
" स्थिर, स्थिर, स्थिर, रामा." सर्वही बोलताती.
बहुविध पशुपक्षी त्यांसवें धांव घेती. ९५.

" रामा, अटव्याप्रति तूं न जायें; । जासी तरी घेउनि सर्व जायें.
आधार कोणी तुजवीण आम्हां । नाहींच येथें, गुणसिंधुधामा." ९६.

रडत सकल येती, वाहि तें नीर नेत्रीं.
उडत रथधुळी ते बैसली सर्वगात्रीं. ।
दशरथ नृप बोले, " वाक्य माझें न मोडीं.
क्षणभरि, रघुनाथा, राहवीं स्थीर घोडीं. ९७.

वाहें, वाहें मस्तकीं वाक्य वाहें. । राहें, राहें, राघवा, स्थीर राहें.
नाहीं, नाहीं राखणें प्राण नाहीं. । पाहीं, पाहीं हेचि हे भेटि पाहीं. ९८.

भावीं, भावीं रूप तूझेंचि भावीं. । दावीं, दावीं येकदा वक्र दावीं.
गेलें, गेलें सर्वही सत्व गेलें. । झालें, झालें पोरकें राज्य झालें!" ९९.

श्रीराममाता, फणिअंबिकाही । दुःखानळें व्याकुळ व्यस्तदेही.
बोली मुखीं "राघव दीनबंधू । वना न जावो, सुखसारकंदु." १००.

पाहोनि हें सर्वहि रामराजा
बोले सुमंत्राप्रति वाक्य वोजा. ।
" लोटीं रथा सत्वर, वेग कीजे.
आलस्य आतां सहसा न कीजे." १.

घडघड रथ नेटें चालवीला सुमंत्रें.
दशरथ स्थिर पाहे लक्ष लावोनि तेथें.
न दिसत मग दृष्टी, लोटला दुःखरंगीं.
रघुपतिनिजमाता सांवरी ते प्रसंगीं. २.

तयानंतरें स्वस्थ झाला नरेंद्रु. । विलोकी पुरी, जेंवि गर्जे समुद्रु,
तशी सर्वही शोकनादेंचि गाजे; । अटव्यापरी ऊपमा तीस साजे. ३.

गाळीत अश्रु नृप तो सदनासि गेला.
टाळी न दुःख परी तें अनिवार त्याला. ।
पाळीत जो रघुपती सकळां जिवांतें,
चालीत तो रथहयांप्रति सूतहातें. ४.

नदी तामसा क्रमिली रात्रि तेथें. । द्वितीये दिनीं रम्य गंगातटातें
त्वरें पावले. सेविलें तोय तीचें. । पुढें लोटलें मान तें शार्वरीचें. ५.

उपारें जटिल झाले तापसीवेषधारी.
बहुविध शिकवीला सूत नाना प्रकारीं. ।
परतत नगरासि रामआज्ञे सुमंत्रु.
त्वरित गुहक आणी नाव तो राममित्रु. ६.

बैसोनि नावे परतीर जेथें । गेले सुखें सत्वर क्षेम तेथें.
देवोनि आज्ञा मग त्या गुहासि, । आले ऋषीच्या निजआश्रमासि. ७.

भरद्वाजा गेहीं क्रमुनि हरुषें सर्व रजनी,
निरोपेंची त्याच्या फणिवर, सिता, राम विजनीं ।
पुढें होती. दृष्टी बहुविध तरूतें निरखिती.
कुरंगांचीं थाटें भयभित मनीं दूर पळती. ८.

तदुपरि निजवस्ती सारिली चित्रकूटीं.
तंव सचिव सुमंत्रू पावला राजभेटी. ।
पुसत नृप तयाला. येरु वृत्तांत सांगे.
न धरत धिर दुःखें राजयाला प्रसंगें. ९.

श्रीराममाता शरशब्दजाळीं
भेदी नृपा सत्वर तेचि काळीं. ।
तो जोडुनी हस्तक पाय वंदी,
जैसा नृपा याचक, भाट, बंदी. ११०.

म्हणे श्रेष्ट कांता, " अहो प्राणनाथा,
करा, जी, क्षमा. मानसीं पुत्रचिंता, ।
म्हणोनी तुम्हां बोलिलें तीव्र बोली. "
पुढें सेविती शीघ्र साष्टांग झाली. ११.

वदे राय, " वो, स्वल्प अन्याय तूझा
न दीसे, मनू देतसे साक्षी माझा. ।
महापाप नेणोनि म्यां पूर्वि केलें;
गजू कल्पुनी श्रावणा मारियेलें. १२.

विनानेत्र त्याचेनिया मायबापें,
मला शापिलें थोर संतापकोपें. ।
परी वाटलें मानसीं सौख्य तेव्हां.
गमे आजि हा प्राण जाईल केव्हां. १३.

बहू ग्लानि भाकी, ढळे नीर नेत्रीं.
  पुढें रामध्यासेंचि तो अर्धरात्रीं, ।
मरे. ऊपरी शोक अत्यंत झाला.
  वसिष्ठें पुढें वारिलें त्या स्त्रियांला. १४.

नृपालागिं घालोनियां तैलद्रोणी,
  पुढें मातुळींहूनियां पुत्र दोन्ही ।
त्वरें आणवायासि तैं दूत धाडी,
  तयांलागिं साकल्य सांगे निवाडीं. १५.

× × × × ×

## अरण्यकाण्ड.

नमन गणपतीतें, शारदासद्गुरूतें,
तदुपरि करि त्यांतें भाविकां श्रोतयांतें. ।
निवळ करुनि चित्ता आयिका ऐक्यतेनें;
दुरित परम जातें साच एकाक्षरानें. १.

रघुपति सहसीतालक्ष्मणेंसीं निघाला.
ऋषिजन वनवासी सर्व आनंदवीला. ।
हळुहळु मग जातां लागली माळभोई.
तरुवर अति दाटी जाहली ठायिं ठायीं. २.

सुमित्रासुतासी वदे रामराजा, । “ बरें रक्षिजे जानकीलागिं वोजा.
महावात, अद्भूत आवर्त भासे, । महाश्वापदांच्या भयें जीव त्रासे ” ३.

बोलोनि ऐसें ऋमिती पथातें, । तों देखिला राक्षस एक तेथें,
विराधनामा रुधिराशनी, हो, । बीभत्सरूपी अतिचंड देहो. ४.

विकृत वदननेत्रीं, दर्शनीं घोर गाढा,
रुधिररससुरंगें राबल्या दंतदाढा. ।
निरखुनि नर दृष्टी गर्जला काळ जैसा,
तदुपरि वरि आला, लोटला शैल तैसा. ५.

अवचट मग सीता घेउनी स्कंधभागीं,
परतुनि मग चाले तीव्र तो हर्षरंगीं. ।
रघुपति तंव दुःखें भाकिता ग्लांति झाला.
न धरत फणिनाथा कोप अत्यंत आला. ६.

विरीं ऊपरी वाहिले चंड मेढे. । बहू सोडिले बाण नेटें कुऱ्हाडे.
विराधासि भेदोनि पैलाड गेले, । फणींचेपरी भूमिमाजी रिघाले. ७.

ठेवोनि सीता मग तो विराधु, । प्रेरी सुळा गर्जुनियां अगाधु.
तो राघवें खंडुनि टाकियेला. । त्यानंतरें सन्मुख दैत्य आला. ८.

वाहोनि खांदीं उभयीं नरांतें, । धांवे त्वरें रक्ष सकोपचित्तें.
खंडोनि शस्त्रें कर पाडियेला, । तों जाहलें पूर्विल ज्ञान त्याला. ९.

" गंधर्व जो तुंबरु तोचि, रामा, । मी जाण, गा, शापवशें अरामा
येवोनियां राक्षसदेह जालें. । कृपाळुवें पावन शीघ्र केलें. १०.

मला अस्त्रशस्त्रीं कदा मृत्यु नाहीं, । विधीवाक्य हें; सांगतों युक्ति कांहीं.
करा चंड गर्ता तयामाजि घाला. । पुढें प्राण जातील होवोनि गोळा." ११.

करी राम आज्ञा सुमित्रासुतासि. । करी वीर सौमित्र तैसेंचि त्यासि.
पुढें राक्षसा मुक्ति झाली प्रसंगें. । सिता भेटली, चाललीं तीव्र तीर्थे. १२.

तयानंतरें बाणभंगाश्रमासि । त्वरें पावले, भेटले वीर त्यासि.
निरोपें सुतीक्ष्णाश्रमालागिं गेले. । ऋषी अन्य त्याच्या गृहालागिं आले. १३.

दहा वत्सरें लोटतां क्षेम वस्ती, । पुढें पावले वास जेथें अगस्ती.
ऋषी चापबाणांसि अर्पोनि बोले. । म्हणे, "पंचन्ययोधिं जा, वास कीजे. १४.

उपरि ऋषिनिरोपें क्रमितां पंथ, वृक्षीं
अचल, अविट तैसा देखिला गृध्रपक्षी. ।
निशिचर म्हणवोनी राम कार्मूक वोढी.
विनवि मग जटायू, " बाण, वीरा, न सोडीं. १५.

दशरथनृपनाथू, राघवा, तात तूझा,
परम सुशिल, धर्मी, जाण तो मित्र माझा. ।
सुखरुप वनिं राहीं, निर्मुनि आश्रमासि.
निशिदिनिं विपिनीं मी रक्षिता जानकीसि." १६.

पुढें शीघ्र गंगातटा राम आला. । वटां पंचकां देखतां तोष झाला.
तरू दाटले आंवळे, जांबळीचे, । तथा साल, जंबीर ते पोफळीचे. १७.

कविठ, चंपक आणिक शेंवती, । कदळी, तिंत्रिणि, तिंदुक, मालती,
बकुळ, खर्जुर, दाडिम, भोंकरी, । पळस, किंशुक, अन्य बहूपरी. १८.

करी रामआज्ञे फणी पर्णकूटी. । तिचे भोवती लाविली पुष्पदाटी.
प्रवेशे बरी वेळ पाहोनि रामु. । सुखें काळ लोटी पुढें सौख्यधामु. १९.

एक परमार्थ,। म्हणावें एक प्रकारें. ॥ १२ ॥ दोहींचा शबळांश सांडिजे,। शुद्ध लक्षांश घेइजे, । असिपद होइजे । एक रूप. ॥ १३ ॥ दोहींचा शबळांश मिथ्य, । शुद्धांश सत्य, । आणि दोहीं ऐकमत्य, । भेद नाहीं. ॥१४॥ म्हणोनि त्वंपदाचा शुद्धांश शोधीं, । तेथें भेटि होईल परमानंदीं, । ऐसें बोलिजे वेदीं, । तें परिस बापा. ॥ १५ ॥ तरि त्वंपद शोधन कैसें? । पुसासिल जरि गा ऐसें, । तरी सांगेन विश्वासें,। तें परिस बापा. ॥ १६ ॥ तरी मी कोण ऐसें पाहीं, । जें भुलला अससि स्थूळ देहीं, । देहासकटचि मी म्हणसि पाहीं, । परी कांहीं विचार नेणसि. ॥१७॥ तूं या देहा वेगळा निभ्रांत । हें निर्धारीं गा निश्चित। या देहासि जाणत । तरी देह कैसेनि गा? ॥ १८ ॥ जरि माझें देह म्हणऊनि जाणसि,। तरि तूं देह कैसेनि होसि ?। तूं देहा वेगळा परियेसीं, । जाणता तूं. ॥१९॥ माझें देह म्हणऊनि जाण, । तेंचि तूं चैतन्य आपण,। स्थूळ देहा वेगळा होऊन,। परतोनि पाहे. ॥२०॥ तूं निराकार स्वरूप, । पाहे आपुलिया प्रकाशें आप, । तुझा तूं ज्ञानदीप । होऊनियां. ॥ २१ ॥ तुजविण आपणातें । आणिक कवण गा जाणतें ? । तुझें तूंच देखतें । आपणचि. ॥ २२ ॥ स्थूल देहाचा आकार । तूंचि जाणसी विचार, । हस्त पादादि शिर, । अवयव अवघे. ॥ २३ ॥ पंचभूतांचें शरीर, । औट हात साकार, । याचा जाणसि विचार, । तो जाणता तूंचि. ॥ २४ ॥ रोमावळी, चर्म, शिरा, । मांस, अस्थि हा पृथिवीनिरा, । आकाश याचिया जाणसि विचारा, । तूंचि एक. ॥२५॥ लाळ, मूत्र, शुक्र, शोणिता, । पांचवा स्वेद निरुता, । या आपातें देखता, । तूं वेगळाची. ॥ २६ ॥ क्षुधा, तृषा, आलस, निद्रा, । कांति, या पांच शिष्येंद्रा, । तेजाचिया प्रकारा । जाणता तूंचि. ॥ २७ ॥ चलन, वलन, धांवन, । प्रसरण, आकोचन, । हे वायूचे पांच गुण । जाणता तूंचि एक. ॥ २८ ॥ काम, क्रोध, शोक, जाण, । मोह, भय, हे आकाशगुण, । त्यांस तूं जाण, । यां वेगळाचि तूं ॥ २९ ॥ ऐसा पांचभूतासीं वेगळा । अससि तूं निराळा, । जाणसि सकळां, । तोचि तूं गा. ॥ ३० ॥ जाणणें जें निरुतें । तेंचि तूं निभ्रांतें, । जाणतोसि पंचभूतांतें, । पंचभूत तें तूं कैसेनि होसि? ॥३१॥ पंचभूतें वेगळीं, । ते वस्तू सहजचि मोकळी, । तुज तूं निहाळी, । तुज

बधन कैचें ? ॥ ३२ ॥ पंचभूतें आकारिलीं, । सर्वांचि विलया गेलीं, । तरी मृत्यूतें तेचि पावलीं, । तूं अमर कीं. ॥ ३३ ॥ सहज पंचभूतें । राहिलीं जेथींचि तेथें, । मरण कवणातें । नाहींच गा. ॥ ३४ ॥ पृथ्वी गेली पृथ्वींत, । आप सामावलें आपांत, । तेज तेजांत । राहिलें पैं. ॥ ३५ ॥ वायू मिळाला वायूसीं, । आकाश मावळलें आकाशीं, । उरलासि अविनाशी, । निजरूप. ॥ ३६ ॥ ऐसें तुझें स्थूळ देहें । मांडतें मोडतें हें, । यासि भुललासि पाहें, । मीचि ह्मणौनिया. ॥ ३७ ॥ ह्मणौनि देहभ्रम सांडी, । आपआपणासि निवडी, । जैसा झारा काढी । शोधूनि सोनें. ॥३८॥ मींचि ह्मणौनि देहासि भुललेपण, ।हेंचि आत्मयासि मरण, । याचिलागीं बुझें परिपूर्ण, । अमर रूपा. ॥ ३९ ॥ देहासीं मींच ह्मणऊनि गुंतलासि, । थोर अभिमानीं पडिलासि, । जाति, कुळ धरितोसि । देहाचिया गुणें. ॥४०॥ शूद्र, वैश्य, क्षत्री, ब्राह्मण, । हा देहाचाचि गुण, । तुज नाहीं चारि वर्ण, । यांसि तूं भुलों नको. ॥ ४१ ॥ नांव, रूप देहासींचि, । देहाचिया नांवरूपा जाणसि तूंचि, । तूं आत्मा सहजचि । विश्वाचे देहीं. ॥ ४२ ॥ हें देहचि उत्तम मध्यम, । देहासिच गोत्र नाम, । तूं या देहावेगळा आत्माराम । यासि भुलों नको. ॥ ४३ हें देहचि नर नारी, । हें देहचि होय बाळक उदरीं, । देहचि विस्तारीं । जग जाहालें. ॥ ४४ ॥ योनि-स्नाथगुणें नारी, । लिंग-स्थानें नर अवधारीं, । परि असे दोहीं भीतरीं, । तो नर कीं नारी पैं ? ॥ ४५ ॥ म्हणोनि तो आत्मा अनंत । व्यापूनि बाहेर आंत, । परिपूर्ण सदोदित । लोकत्रयीं. ॥४६॥ ऐसा स्थूल-देह-गुणें । पावसि नाना बंधनें, । तें तुझेनीचि अज्ञानें, । गुंतलासि. ॥ ४७ ॥ तरी देहा वेगळा होई, । देहासि गुंतों नको कांहीं, । तुज तूं न्याहाळीत राही, । सहज सुखी. ॥ ४८ ॥ या स्थूळ देहासि जाणता । तूं स्थूळ देह नव्हेसि सर्वथा, । मींच ह्मणौनि वृथा, । देहीं भुलों नको. ॥ ४९ ॥ या देहाचे षट्विकार, । ऐक त्यांचे विचार, । हें देह नव्हे आणि साकार, । जाहलें असे. ॥ ५० ॥ पूर्वीं न जसें येरी नांदत, । बाळ, तारुण्य, वृद्ध होत, । शेवटीं मरण पावत, । तया तूंचि जाणसि. ॥ ५१ ॥ या साही विकारातें जाणसि, । ह्मणऊनि दोन्हीं नव्हेसि, । आपल्या बाळ-वृद्ध-तारुण्य-

पणासि, । तूंचि देखता कीं. ॥५२॥ माता-गर्भीं आकारलें, । आणि संसारीं नांदलें, । पुढती विलया गेलें, । ऐसें तूंचि जाणसि. ॥ ५३ ॥ हें देह जरी तूं होसि । तरी निद्राकाळीं परियेसीं, । देह काय कवणासि, । जाणत असे ? ॥ ५४ ॥ निद्रेचे अवसरीं । चोर वस्त्रें भूषणें चोरी, । जरी तूं देह तरी । कां जाणसीचि ना ?॥५५॥ अथवा मरण आलें, । गोत्रजांसीं आकांत वर्तलें, । तरी कां नाहीं वर्जिलें । जरी तूं देह तरी ? ॥ ५६ ॥ तूं निद्रा मरणासीं जाणता, । अससी स्वयं बोधें वर्तता, । ह्मणोनि देहीं असोनि देहातीतता । जाण निभ्रांत. ॥ ५७ ॥ स्थूळ देह जागृति अवस्था । याचि जाणसी तूं व्यवस्था, । मीं जागा कीं निद्रिस्था, । ह्मणोनियां. ॥५८॥ आपलें जागणें तूं जाणसी, । म्हणोनि वेगळा जागण्यासी; । जागणें तूं नव्हेसी । सर्वथैव.॥५९॥मीं जागा कीं निद्रिस्त, । ऐसा तुझा तूंच जाणत । ह्मणउनि त्या अतीत, । निरालंब तूं. ॥६०॥ नयन आपुले जागती, । सर्व रूपातें पाहती, । त्यातेंही जाणसी तूंच एक. ॥६१॥ माझे दोन्ही डोळे । ह्मणउनि तुजाचि कळे; । तूं या वेगळें । सहजचि कीं. ॥ ६२ ॥ हें स्थूळ देह ऐसें । आतां लिंग देह तें कैसें ? । तें ऐकचि परियसें, । संचित देउनियां. ॥ ६३ ॥ श्रवणीं शद्ब ऐकणें, । तेथें तुझेंचि जाणणें, । तुजवीण कोणे, । जाणतील गा ? ॥ ६४ ॥ त्वचेचिया सुखदुःखासीं, । त्यातें तूंच जाणसी, । तुजवीण परियेसी, । तूं या वेगळाचि कीं ॥ ६५ ॥ नेत्रीं रूप देखसी, । नेत्रीं दिसे ह्मणउनि तूंच जाणसी, । ह्मणउनि त्यासी । वेगळाचि पैं. ॥६६॥ जिव्हे रसाचि रुची । गोडी षड्रसाची । ते जाणसी तूंचि । तूं या वेगळाचि पैं. ॥ ६७ ॥ घ्राणीं परिमळ, । सुगंध दुर्गंध आणि अनिळ । तेथें जाणता केवळ । तूंचि कीं. ॥ ६८ ॥ ऐसीं ज्ञानेंद्रियें पांचीं, । यांसीं जाणता तूंचि कीं, । ह्मणउनि वेगळेंचि । चैतन्य तूंचि. ॥ ६९ ॥ वाचा जे जे बोल बोले । ते तुवांचि जाणतिले, । ह्मणोनि वाचेसी वेगळें । तुझें रूप. ॥ ७० ॥ हातासी घेणें देणें । तेंही तुजचि जाणणें; । पायांसि चालणें । जाणता तूंचि. ॥ ७१ ॥ शिश्नाचा जो व्यापार । तोही जाणसी तू विचार, । गुदस्थानिचा निर्धार । तुजाचि ठाउका.॥ ७२ ॥ ऐसीं पांचही कर्मेंद्रियें । यांचीं जे जे कार्यें । जाणसी तूंचि समस्तें । दशेंद्रियें पैं. ॥ ७३ ॥ या दश इंद्रियामधिं । अंतःकरण मन बुद्धि । चित्त अहं-

काराची शुद्धि । तूं जाणसी. ॥ ७४ ॥ नाहीं विषयवासना । जें निश्चळ अंतःकरण । तयासीं तूंच जाण । निश्चळ ह्मणउनियां. ॥ ७५ ॥ कल्पना सोडी धरी । हे मनाची कुसरी, । ते तूं जाणसी जरी । मनासी तूं या. ॥ ७६ ॥ बुद्धि करी निश्चयात्मक । तिसीं जाणसी तूंचि एक । बुद्धीसीं प्रकाशक । तूंचि कीं, ॥ ७७ ॥ चित्ताचें चंचळपण । तें तूंच जाणसी आपण, । सावध कीं व्याकुळ ऐसी खुण । ते तुजचि कळे. ॥ ७८ ॥ मीं ऐसा अहंकार । देहासी भुलोनि व्यापार, । तोही निर्धार । तुजचि कळे. ॥ ७९ ॥ हे समस्त गुण ऐसे । वायांचि भुलविले असे; । सुख दुःख घेत असे । मींचि ह्मणउनि अहंकार. ॥ ८० ॥ ऐसें अंतःकरण मन बुद्धि । चित्त अहंकाराची शुद्धि । तूंच जाणसी गुणनिधि । चैतन्यरूपा. ॥ ८१ ॥ प्राण जाण नासाग्रें । इडा पिंगळा मोहरें, । त्या जाणसी विचारें । जाणितलें तुंवा. ॥ ८२ ॥ अपान वाहे अधोद्वारें । त्यासी तूंचि जाणसी, बारे, । यां समस्तां निर्धारें । तुंवा जाणितलें. ॥ ८३ ॥ तूं निराकार स्वरूप, । शून्यासारिखें तुझें रूप, । हें साकार सांडुनियां आप । पाहे आपणा. ॥ ८४ ॥ व्यान, उदान, समान । आणि अपान, प्राण । ऐसा पंच प्राण । यांस तुजवांचून कवण जाणता ? ॥ ८५ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधासीं । तूं जाणसी पंच विषयांसीं, । ह्मणउनि पंचवीस कळा लिंग देहासी । जाणता तूंचि. ॥ ८६ ॥ अंतःकरणाचें निश्चळपण, । मनाचें मनन, । बुद्धीचें बोद्धव्य चित्ताचें चंचळ लक्षण, । अहंकाराचें मीपण । जाणता तूंचि. ॥ ८७ ॥ श्रोत्रें ऐकसी, । त्वचेसी सुख भोगिसी, । नेत्रीं रूप देखसी, । तूंचि एक. ॥ ८८ ॥ जिव्हेसीं रस चाखसी, । नासिकीं परिमळा घेसी, । या इंद्रियासीं जाणतोसी । तूंचि एक. ॥८९॥ वाचे जें जें बोलणें, । हातासी देणें घेणें, । पायांसी चालणें । तुझेनीचि. ॥ ९० ॥ शिश्नें जें भोगणें, । गुदासी मलोत्सर्ग सांडणें, । इतुकें तुझेनींचि; परि नाहीं तुजकरणें । इंद्रिय व्यापार. ॥ ९१ ॥ ये दाही इंद्रियें तुझनीचि चालति, । अंतःकरणाची मति, । परी तूं वेगळाचि स्वयं ज्योति, । अकर्ता तूं ॥९२॥ आणि पंच प्राण, पंच विषइक । हे तुझेंनीचि ऐक । सकळांसि तूं नायक । चालवितां तूं. ॥ ९३ ॥ तुझेंनीचि हें चाले । आणि तुवांचि ह्मणियें दिल्हें; । तुवां सर्वांतें जाणितलें । सर्व-

साक्षित्वें. ॥ ९४ ॥ तुज तुवां नाहीं देखिलें । ह्मणोनि इंद्रिय व्यापार ह्मणसी म्यां केले. । त्या इंद्रियांसीं तुवां जाणितलें । तरी व्यापार तूं कैसेनि? ॥९५॥ इंद्रियांचिया व्यापारा आणि इंद्रियांसीं । तूंचि गा जाणसी, । तरी इंद्रिय-व्यापारांसीं । तूं वेगळाचि. ॥ ९६ ॥ अज्ञानें भ्रमलासी, । आणि अहंकारें भुललासी । ह्मणोनि मानिसी । मींच ह्मणोनि, ॥ ९७ ॥ ह्मणोनि कर्मे जडे । अज्ञाना आंगें घडे, । मग दाखवी पवाडे । गर्भवासाचे. ॥ ९८ ॥ इंद्रियांचे व्यापार वेगळाले । सहज जे जे जाले । ते तुवां भोगुनि पाहिले । तो तूं वेगळाचि. ॥ ९९ ॥ ह्मणोनि तुज त्यजितां नाहीं त्याग, । भोगितां नाहीं भोग, । ऐसा करितां ज्ञानभोग, । बंधन नाहीं. ॥१००॥ विषय इंद्रियांची परी । वर्ते तुझिया मनाधारीं । निश्चळ बैसोनि निर्धारीं । तरी तुज बंधन कैचें? ॥१०१॥ इंद्रियें तरी चालती तुझेनीचि । परी तुज करणें नाहींचि, । तूं निरालंब सर्व गुणांसिचि । वर्तणूक जाणसी. ॥ २ ॥ या सर्व गुणांसी चाळिता । तो तूं आपणा जाणता, । तुज तूं प्रकाशलासि आतां । तुझा तूंचि. ॥ ३ ॥ पंचवीस कळांचे लिंगदेह पाहे । तेथें स्वप्नावस्था आहे, । तिचि तूं सोयं । जाणतोसि गा. ॥ ४ ॥ स्वप्नीं जें देखिलें । तें जागृतींत हरपलें, । परि जाणणें उरलें । विश्व देहीं. ॥ ५ ॥ स्वप्नीं जे दिसे । तें जागृतींत नासे, । या दोहींतें जाणत असे । तें गे तेचि. ॥ ६ ॥ जागृतींत देखिलें । तें स्वप्नीं नाशलें; । स्वप्नीं देखिलें । तें जागृतींत हारपे. ॥ ७ ॥ जागृती जालिया असे । तें स्वप्नीं नांदत असे; । परी या दोहींतें जाणत असे । तें तूं अखंडित. ॥ ८ ॥ ह्मणोनि स्वप्न-जागृती वेगळा । तूं अससि निराळा, । निरालंब निखळा । चैतन्य तूं. ॥ ९ ॥ ऐसें पाहतां अनुभवें । प्रपंचा-पासाव सुटावें, । मुक्ति सायुज्यता पावावें । ह्मणे **ब्रह्मणी मुंतोजि.** ॥१०॥ हें ऐकतां मनोभावें । कवणें दुश्चित न व्हावें, । भवरोगियानें सेवावें । अमृत हें. ॥ ११ ॥ दुश्चित होय जो नर । तो भोगी अघोर; । सावचित्त तो पैलपार । उतरला पैं. ॥ १२ ॥ इति**श्रीप्रकाशदीपे** गुरुशिष्य संवादे **लिंगदेह निरसनं** नाम द्वितीय प्रकरणं समाप्तं ॥ २ ॥ श्री **जनार्दनार्पण-मस्तु.** ॥ शुभं भवतु. ॥ श्रीरस्तु. ॥

**श्री जनार्दन.**

ना नव्हेसि स्थूळ देह, । नव्हेसि लिंग देह, । या दोहीं देहातीत राहे, । कैवल्य तूं. ॥ १ ॥ या दोहीं देहांसि जाणता, । दोन्ही देह नव्हेसि सर्वथा, । आतां जाणणेंचि निभ्रांता । चैतन्य तूं. ॥ २ ॥ तंव शिष्य म्हणे कृपा-वचना । दोहीं देहांची विवंचना, । पुढती सांगावी रचना । परतोनियां. ॥ ३ ॥ ऐक शिष्या. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश । यांचे पंचविस अंश । रोम, चर्म, नाडी, मांस, । अस्थि पृथ्वीचे. ॥ ४ ॥ लाळ, मूत्र, शुक्र, शोणित, । स्वेद हे पांचे आप निभ्रांत; । वोळख पां समस्त । शिष्य-राजा ॥ ५ ॥ क्षुधा, तृषा, आलस्य, । निद्रा, कांति हे अंश । हे तेजाचे परियस, । एकचित्तें. ॥ ६ ॥ चलन, वलन, धावन, प्रसरण, । आकुंचन हे वायूचे गुण । पांच ते जाण । निभ्रांत पैं. ॥ ७ ॥ काम, क्रोध, शोक, जाण । मोह, भय, हे आकाश गुण । हे पांच सांगितले जाण । शिष्यराजा. ॥ ८ ॥ ऐसें पंच-विसांचें शरीर, । तेथें जागृति अवस्था निरंतर । विश्व अभिमानी निर्धार । या स्थूळ देहाचा. ॥ ९ ॥ नेत्रस्थान स्थूळ भोग जाण, । रजो गुणांचा प्रपंच पूर्ण; । स्थूळदेह शरीर हे खूण । जाणसी पैं, गा. ॥ १० ॥ आतां लिंगदेह कैसें? । पंचवीस कळांचें परियसें, । सूक्ष्मदेह ह्मणिजत असे, । ऐक सावधान. ॥ ११ ॥ तरी अंतःकरण, मन, बुद्धी, हें, । श्रोत्र, त्वचा, चक्षू, घ्राण, जिव्हा हें, । ज्ञानइंद्रियें हीं । जाण पैं, गा. ॥ १२ ॥ वाचा, पाद, पाणि, पायू, गुद । हीं कर्मेंद्रियें पंचविध; । व्यान, समान, उदान, प्राण, अपान, भेद । प्राणपंचक हें ॥ १३ ॥ शब्द, स्पर्श, रूप, हे । रस, गंध, पंचवीस हे, । पांचही विषय हे । निरुते जाणावे. ॥ १४ ॥ ऐसें पंच-विसा कळांचें । सूक्ष्मदेह जीवाचें । स्वप्न अवस्थेचें । मंदिर गा. ॥ १५ ॥ अभिमानी तैजस, । कंठस्थान भोग प्रविविक्त । जाणिजे ससत्वगुण अंश । प्रपंच हा. ॥ १६ ॥ ऐसीं तुझीं शरीरें दोन्हीं । तूं नव्हेसि जाण, ह्मणउनि । पाहें पां विचारुनी । तुजसी तूं. ॥ १७ ॥ या दोहीं देहांचा ज्ञाण । सांग पां तूं कवण? । या बोलाची खूण । शिष्य विचारूं गेला. ॥ १८ ॥ या समस्तांसि मीं ज्ञाणता । तो मींचि कवण निभ्रांता । । विचारूनि माथा । ठेविला श्रीगुरु चरणीं. ॥ १९ ॥ या समस्तांसि जाणे । तो मीं

आपणातें नेणे; । तयातें मज दावणें । श्रीगुरू बापा. ॥ २० ॥ मग श्रीगुरू ह्मणे भलें, । तुवां दोन्ही देह जाणितले, । तुझें अज्ञान नाहीं निरसलें । आत्मयाचें. ॥ २१ ॥ तूं जाणत आपणियातें नेणसी । हें लक्षण अज्ञानासी, । लटिकें अज्ञान वाहतोसी । निज मस्तकीं. ॥ २२ ॥ मीं नेणे आपणियातें । ऐसें जाणत असंसी तये नेणिवेतें; । सांगत असंसी निरुतें । तुझा साक्षी तूं. ॥ २३ ॥ मीं आपणातें नेणें । ऐसें अज्ञानासि न घडे ह्मणणें, । ह्मणउनि सत्यरूप तूं चैतन्य आपण; । अज्ञान मिथ्या. ॥ २४ ॥ सांडूनि सूक्ष्मस्थूळदेहातें । पाहों गेलासी आपणातें, । तंव वर्ण व्यक्ति निरालंबातें । पाहातां भांबावलासी. ॥ २५ ॥ तुजजवळी तूं असतां । कां गा भांबावलासि निरुता? । मीं नेणे ऐसें जाणता । तुजवीण कवण सांगतो पैं? ॥ २६ ॥ तुजपासीं तूं असंसी, । नाथिल्या अज्ञानें कवळला जातोसी, । मीं नेणें ऐसिया अज्ञानासीं । जाणता तुजवांचूनि कवण? ॥ २७ ॥ मीं आपणयातें नेणे ऐसा हेतु । त्या नेणणियातें असे जाणतु ह्मणौनि द्रष्टा अज्ञानातीतु । निभ्रांत पैं गा. ॥ २८ ॥ नेणे ऐसें वायांचि मानिसी, । कां मीं जें नेणे ऐसें जाणत असंसी, । तरी जाणणें तूंचि होसी, । नेणणें मिथ्या. ॥ २९॥ जाणणें तें ज्ञान । नेणणें तें अज्ञान, जाणणें तें तूं चैतन्य । निजरूप. ॥ ३० ॥ अज्ञान तुज पासाव उठिलें । तेणेंचि तुज भ्रमविलें, । जैसें बाबुळिनें कोंदिलें । जीवन तैसें. ॥ ३१ ॥ उदकापासूनि उठिली बाबुळी । आणि त्या उदकासीचि कवळी, । तैसें तुज वेटाळी । अज्ञानबुद्धी. ॥ ३२ ॥ त्या अज्ञानें भ्रमलासी । आणि आपणातें चुकलासी । मग देहातें धरूं लागलासी । मींचि ह्मणउनी ॥ ३३ ॥ ह्मणउनि स्थूल सूक्ष्म दोन्ही । मानिसी मींचि म्हणउनि, । तूं जाणसी तें दोन्ही । ह्मणउनि त्यां वेगळा. ॥ ३४ ॥ स्थूलसूक्ष्मदेहातें । आणि विपरीत ज्ञानातें । ह्मणौनि अज्ञानातें । कारणदेह म्हणिजे. ॥ ३५ ॥ आणि विपरीत ज्ञान तें कोण? । ऐसें पुससील आपण, । तरी दोन्ही देह ऐसें ज्ञान । त्यासि ह्मणिजे. ॥ ३६ ॥ जेथें दोन्ही देह निरसले । तरी तें विपरीत ज्ञान लटिकें जालें; । जेणें दोन्ही देह निमाले । तें कारणदेह पैं गा. ॥ ३७ ॥ आणिक याप्रकारासीं । अज्ञान मूळ परियेसी, । त्या वेगळा

जालासी । सत्यरूपा, ॥ ३८ ॥ तुझें कारणदेहअज्ञान । तया वेगळा जालासी आपण; । उरलें शुद्ध ज्ञान ॥ तूं परम स्वरूप. ॥ ३९ ॥ मीं मज नेणे । ह्मणउनी तुवां जाणितलें आपणें, । जाणितलें जाणणें । तुवांचि की. ॥ ४० ॥ नेणणियासीं जाणितलें । त्या नेणणिया वेगळें जालें, । ह्मणौनि कारणदेह सुटलें । तुजपासुनि गा. ॥ ४१ ॥ ज्या अज्ञानें आंवरिला होतासी । त्या अज्ञाना पासूनि सुटलासी, । आतां तूंचि उरलासी । परम स्वरूप. ॥ ४२ ॥ जैसें बाबुळिसहातें वारिलें । तेथें शुद्ध उदक उरलें, । तैसें अज्ञाना वेगळें जालें । तूं निजरूप. ॥ ४३ ॥ जेथें अज्ञाना वेगळें जालें । शुद्ध चैतन्य निरालंब उरलें, । गर्भवास सरले । आपेंआप. ॥ ४४ ॥ अज्ञानवशें संसार, । ऐसा वेदांतिचा विचार, । अज्ञानासीं होय संहार । तेथें संसार कैंचा ? ॥ ४५ ॥ आह्मयांसि जें बंधन । तें जग प्रसिद्ध अज्ञान; । जेथें प्रकटे आत्मज्ञान । तेथें बंधन कैंचें ? ॥ ४६ ॥ ह्मणौनि आत्मज्ञानेंविण ऐक । उपाय करिति अनेक, । तेणें गुंफसी अधिक । भववृक्षीं. ॥ ४७ ॥ अज्ञानसंगें नानाबंधनें । तितुकीं वारिलीं आत्मज्ञानें, । महापातकें दहनें ॥ केलीं देखा. ॥ ४८ ॥ अज्ञाना वेगळा जाला । तो जीवन्मुक्त बोलिला; । जितांचि पावला । सायुज्यता. ॥ ४९ ॥ येचि देहीं असतां । जाला मुक्तीचा सोहळा देखता, । मेलिया पावेल हे वार्ता । कवण जाणेल गा ? ॥ ५० ॥ अनेक मार्गें बोलिलें बहुतें । मंत्र यंत्र उपदेशितें । ते वेगळे नव्हती येथें । संसारासीं ॥ ५१ ॥ जेथें आपणासि नाहीं देखिलें । त्याचें काय कीजे बोलिलें ? । ज्याचें अज्ञान नाहीं सुटलें । आत्मयाचें. ॥ ५२ ॥ त्या आंधळ्याचें बोल । जैसें कणेविण फोल । गुंफलें उगवैल । त्याचेनि कैसें ? ॥ ५३ ॥ आतां असो, इतुलें । स्थूल सूक्ष्मासि जें व्यालें । तें कारण देह बोलिलें. । तें मिथ्या अज्ञान. ॥ ५४ ॥ मुळीं अज्ञानचि मिथ्या, । मग तयाचें कार्य-केविं सत्य ? । म्हणउनि स्थूल सूक्ष्म असत्य । शोधावेंचि नलगे. ॥ ५५ ॥ तुझें कारणदेहचि अज्ञान, । तेथें सुषुप्तीचें स्थान, । एकाग्र करूनियां मन । सांगेन परियेसि. ॥ ५६ ॥ जागृति स्वप्न अवस्था दोन्हीं । जीवें भोगिल्या इंद्रियांचेनि; । वेध लागला मनीं । तो जेथें विसरला. ॥ ५७ ॥ जागृति

आणि स्वप्न. । नाहीं इंद्रियें आणि मन, । ते सुषुप्ति, अज्ञान । अवस्था गा. ॥ ५८ ॥ सुषुप्तिसीं असोनि सुषुप्तीतें । तूं जाणसी तये नेणिवेतें, । जागा होउनि सांगसी; येथें । तुझा साक्षी तूं. ॥ ५९ ॥ मीं जाग स्वप्न पाहत । ऐसा नव्हता माझा हेत, । ऐसें तूंचि सांगत । तया नेणिवेतें. ॥ ६० ॥ जागृति स्वप्न विसरलासि, । जागा होउनि तूंचि सांगसी, । ह्मणौनि वेगळा तेथें सुषुप्तिसीं । जाण अनुभवें. ॥ ६१ ॥ जागृति, स्वप्न, सुषुप्तिसीं । तिहीं अवस्थांसि जाणसी, । ह्मणौनि तिहींसीं । तूं साक्षी चैतन्य. ॥ ६२ ॥ जागा ह्मणौनि जाणसी; । ह्मणौनि स्वप्न अवस्थेसीं । जागृति स्वप्न विसरलासि । ह्मणउनि सुषुप्तिसीं जाणता तूंचि. ॥ ६३ ॥ ह्मणौनि तिहीं अवस्थां वेगळा । तूं अससी निराळा । तूं जाणणेंचि निखळा । तेचि तूं.॥६४॥ सुषुप्तिअवस्था आणि देहकारण । प्राज्ञ अभिमानी हृदयस्थान, । मूर्छनानंदभोग आणि तमोगुण । जाणता तूंचि. ॥ ६५ ॥ हा तमोगुणाचा प्रपंच विस्तार । यासि जाणता तूंचि चतुर; । आतां त्रिगुणांचा संहार । तुंवा केला ज्ञानें. ॥ ६६ ॥ सत्व-रज-तमविरहित । जालासि अतीत; । चुकलासि जन्म मृत्य । अक्षय जालासी. ॥ ६७ ॥ हें सर्व नहोनि सर्वार्थें । निराकार, निराभास जाणतें । निरालंब आपणियांतें । बुझलासि तूं. ॥ ६८ ॥ आपणासि पाहे तूं । जाणावयासि तरि जाणणें तेंचि तूं । ऐसा अखंडित हेतू । अनुभवित असे. ॥ ६९ ॥ जें जें तूं जाणसी । तितुकें मीं नव्हे म्हणौनि सांडिसी; । तरि जाणणेंचि उरसी । तोचि तूं पैं, गा. ॥ ७१ ॥ जितुकें तुज दिसे । तितुकें नव्हेसि, परियसें. । देखतेंचि उरलें असे । तेंचि तूं आपण. ॥ ७२ ॥ सकळांसि जाणे जें जाणणें । तेंचि उरलें आपणें, । तें जाणावें कवणें? । तें विचारी पां. ॥ ७३ ॥ मग नेणण्यासारिखें उरलें । शून्यासारिखें देखिलें । तें रूप आपलें । प्रत्यक्ष जाण. ॥ ७४ ॥ जें जाणणेंचि एकवटलें, । मग जाणणें तें राहिलें, । मग नुसधें उरलें । आपणचि. ॥७५॥ जेथें मन राहिलें, । चित्त समरसलें, । जेथें बोलणें खुंटलें, । स्वरूपाचि तें. ॥ ७६ ॥ जें जें तुज कळे । तूं त्या त्या वेगळें; । सकळ कळोनियां न कळे ॥ तेंचि तूं आपण. ॥ ७७ ॥ ऐसें त्वंपद शोधिलें । आपण आपणातें गवसलें । ब्रह्मणी मुंतोजि म्हणे, भलें । योगिराज.

॥ ७८ ॥ इतिश्रीप्रकाशदीपे गुरुशिष्य संवादे कारणदेहनिरसनं नाम तृतीय प्रकरणं समाप्तं ॥ ३ ॥ श्रीराम ॥

श्रीजनार्दन ॥

आत्मयाचें जाणणें । तें महाकारण ह्मणणें, । आपणा जाणावया स्फुरण । तें ज्ञान जें कां ॥ १ ॥ तेथें तुर्यावस्था, । सर्व साक्षिणी सर्व व्यवस्था, । जैसी सूर्याची प्रकाशदीप्तता । तैसी तुर्या. ॥ २ ॥ मीं नव्हें स्थूळ, सूक्ष्म, कारण । ऐसें आपणासि जें जाण । ते तुर्यावस्था खूण । वोळखावी गा. ॥ ३ ॥ जागृति, स्वप्न, सुषुप्तिसीं । जें जाणणें तिहीं अवस्थांसीं । ते तुरिया परियेसी । सर्व साक्षिणी. ॥ ४ ॥ जैसा सूर्य आणि सूर्याचा प्रकाश, । दिवा आणि उजेड जैसा, । तैसी तुर्या आत्मप्रकाशा । ज्योतिरूपा. ॥ ५ ॥ जेथें प्रत्यगात्मा अभिमानी । मीं निरामय, निर्गुण ह्मणौनि, । जो तेथें अभिमानी ॥ तोचि गा तूं. ॥ ६ ॥ अविद्यामय प्रपंच । तो लटिका, मीं साच; । मीं नव्हे हा निर्वेच । माझा मजचि. ॥ ७ ॥ निर्मळ, निर्गुण, निष्फळ, । तो मीं हें सकळ । ऐसा जो केवळ । तो प्रत्यगात्मा अभिमानी. ॥ ८ ॥ हा प्रत्यगात्मा अभिमानी । नव्होसि दिसे तुज ह्मणौनि, । मूर्ध्निस्थान आनंद भोग दोन्ही । हें नव्हेसि तूं, गा. ॥ ९ ॥ शुद्धप्रपंच, शुद्ध सत्वगुण, । याहीं वेगळा होऊन, । निरालंब ऐसें मानून । तूं स्वयंप्रकाश. ॥ १० ॥ तूं सिद्ध जाणणियांची रासी, । तूं चैतन्य परियेसी; । सर्व देहीं जाणसी । आपुलेनि प्रकाशें तूं. ॥ ११ ॥ सकळांसि जाणितलें । तें जाणणेंचि उरलें; । तें रूप गा आपुलें, । जाण बापा. ॥ १२ ॥ जें जें तूं जाणसी । तें तें तूं नव्हेसी; । मग जें उरलासी । तोचि तूं, गा ॥ १३ ॥ तूं जें उरलासी तयातें । आणिक कोणी नाहीं जाणतें; । तूंचि जाणसी सकळांतें । स्वयंप्रकाश. ॥ १४ ॥ तुझा तूं प्रकाशसी, । दुजें हारउनी आपणांतें जाणसी, । तेंही जाणणें जाणसीं । तूं निजज्ञानें. ॥ १५ ॥ सांडूनि दुजेपण । तूंचि उरलासि आपण, । तेथें कवण तुजवांचून । जाणता पैं गा ? ॥ १६ ॥ आपल्या प्रकाशें आपणासीं । सूर्य दावी सूर्यासी, । तैसें आपुलिये प्रकाशीं । देखता तुझा तूं. ॥ १७ ॥ आपुलिया उजेडासीं । सूर्य परतोनियां ग्रासी, । मग देखे आपणासीं ।

स्वस्थानीं तो; ॥ १८ ॥ तैसा तुझी प्रकाश तुर्या। ते गिळली परतोनियां, । मग उरलासी नेणणें होउनियां । शून्या सारिखा; ॥ १९ ॥ शून्या सारिखा ह्मणौनि शून्य ह्मणिजे, । सकळ शास्त्रीं उपमा दीजे, । परी शून्य नव्हेसि जें। चैतन्य तूं. ॥ २० ॥ शून्य तेंही तूं जाणसी । ह्मणौनि तूं शून्य नव्हेसी; । कांहीं नाहीं त्यासीं शून्य ह्मणसी । तूं जाणोनियां. ॥ २१ ॥ तूं निराकार, निराभास जें। निरामय, स्वयंप्रकाश जें, । तूं निश्चळ, निरालंब, अविनाश जें । परम स्वरूप तूं. ॥ २२ ॥ आतां असो हें सकळ । परम स्वरूप केवळ. । तूं जाणणेंचि निखळ । स्वयंप्रकाश. ॥ २३ ॥ ऐसा अखंड खुणा । तूं वोळखे आपणा; । दुश्चित एक क्षण । होऊं नको. ॥ २४ ॥ हें दुश्चितपण । तेंचि जाण अज्ञान । लोप करी आपण । देखों नेदी. ॥ २५ ॥ जंव दुश्चित होतासी । तंव आपणयासीं चुकसी; । आणिक कांहीं न दिससी, । मग धांवों लागसी भ्रांतरूप. ॥ २६ ॥ ह्मणोनि क्षण एक नव्हे दुश्चिता । आपणासि आपण पाहतां । गवसलासि अवचिता। सुकृतें एकें. ॥२७॥ तुझा तूं दुश्चिता होसी । तरी तूं आपणासि चुकसी; । मग भांबाउनि देहासि धरिसी । मींचि ह्मणौनि. ॥ २८ ॥ ह्मणौनि देहभ्रम सांडी, । आपणासि तूं निवडी, । जैसा झारा काढी । शोधूनि सोनें ॥ २९ ॥ तैसें स्थूळ, सूक्ष्म, कारण, महाकारणा, । शोधूनि काढि आपणा. । मग दुश्चिता एकक्षणा । विसंबों नको. ॥ ३० ॥ नित्यानि तुझा तूं पाहसी । तरी देहा पासूनि सुटसी; । मग स्वरूप तूं होसी । जितांचि बापा. ॥ ३१ ॥ मीं येणें आकारें । जे जीवस्फूर्ति स्फुरे, । तें विचारितां तत्व निर्धारें । दिसे निरालंबीं. ॥ ३२ ॥ तें निरालंब, निरंजन, । जीवाचें जन्मस्थान; । ह्मणौनि होइजे लीन । तेथेंचि बारे, ॥ ३३ ॥ जाउनि एकांतासनीं । मन इंद्रियें आवरुनी । मग आपणासीं न्याहाळुनी । राहिजे स्वतःसिद्ध. ॥ ३४ ॥ कवडाळ पक्षी जैसा । आकाशींहुनी न्याहाळी मासा । लक्ष धरूनि कैसा । धरूनि ठाके. ॥ ३५ ॥ तैसा गवलासी तुझा तूं । लक्षीं न विसंबे हेतू; । आपण आपणा न्याहाळुनी पहातू । निश्चितपणें. ॥ ३६ ॥ जिकडे वृत्ति धांवे तिकडे नवजावें, । चित्त आवरूनि धरावें. । स्वरूपीं लावावें । क्षण क्षणा. ॥ ३७ ॥ धनुर्धर काय करी, । बाण सोडी हिंदाणा-

वरी,। जंव भेदे तोंवरी ।दुश्चिता नोहे. ॥ ३८ ॥ तैसें चित्तें स्वरूप लक्षी । जंव समरस होय सुखी; । मग सुलीन दशा निकीं । पावाशिल. ॥ ३९ ॥ प्रथम स्वरूपीं मन ठेवितां । होय आपणासि देखतां, । परी नसंडे संसार-चिंता । धांवो लागे. ॥ ४० ॥ मागुतें मन वळवुनि । आपणास न्याहाळुनि, । मीं ऐसें मानुनि । ठेवी स्वरूपीं. ॥ ४१ ॥ मग कांहीं लागे, कांहीं नलगे; । थोडें बहुत राहों लागे. ।एकाएकीं न राहे उगें । साधल्या वांचुनी. ॥ ४२ ॥ मग साधितां साधितां साधे, । परब्रह्मीं चित्त बोधे, । आत्मस्वरूपीं आनंदें । राहे तेथेंचि पैं. ॥ ४३ ॥ पावलें मन आनंदातें । आपुले स्वरूपीं बोधे तें; । चालिलें ऊर्ध्वपंथें । न परते मागुते न. ॥ ४४ ॥ मग स्वरूपीं चित्त मुरे, । केवळ जाणणोंचि उरे; । सुखाचाही फुंज उतरे । ते सुलीन दशा. ॥ ४५ ॥ जाणणें उरे परी जाणणेंयातें । परम स्वरूप म्हणिजे तयातें, । तेंचि तूं निरुतें । परब्रम्ह गा. ॥ ४६ ॥ तें जाणणें सर्वातें जाणतें । आपणचि उरे तेथें. । जाणावया कवण तेथें । दुजा आहे ? ॥ ४७ ॥ स्वरुपाचें स्फुरण । तेंचि देह महाकारण, । तेंही पाहसी तूं आपण । निजरूप. ॥ ४८ ॥ तैसें करूनि एकाग्र मन । करितां एकाग्र सावधान । साधलिया वांचूनि मन । स्थिर न होये. ॥ ४९ ॥ अथवा असे मनीं ध्यान । आपआपणयां लक्ष ठेवुन । तरी नलगे कांहीं साधन । तो सहज स्वरूप. ॥ ५० ॥ त्याच्या दहन होती पापराशी; । सहज समाधि बोलिजे त्यासी, । ध्यान असे ज्याचे मानसीं । अखंडित. ॥ ५१ ॥ तो आपणा आपण न्याहाळिता । क्षण एक नव्हे दुश्चिता. । लोकांमाजि असतां । पारि तेथिंचा नोहे. ॥ ५२ ॥ असे इंद्रियांचा व्यापार, । इंद्रियें मीं नव्हे ऐसा त्याचा निर्धार; । मीं स्वरूप निराकार । सर्वसाक्षी. ॥ ५३ ॥ इंद्रियांसीं मीं जाणता, । इद्रियें मीं नव्हें सर्वथा, । तो न लिंपे कर्मं करितां । सर्वकर्मीं. ॥ ५४ ॥ बैसला, उभा, चालतां, । क्षणभरी नव्हे दुश्चिता; । आपणासि न्याहाळिता । अखंड तो. ॥ ५५ ॥ निमिषा-निमिष मन आंवरी, । आपण कोण ऐसा विचारीं; । विचार जो करी । तोचि मीं ऐसें जाणे. ॥ ५६ ॥ विचार जयापासुनि । तोचि मीं ऐसें मानुनि, । मीं कोण विचारुनि । मींचि बोलिलों कीं. ॥ ५७ ॥ मन जेथें जेथें जाये । या

मनासीं जागता आहे, । फुलासरिसा फिरता होये । परिमळ जैसा. ॥ ५८ ॥ जिकडे मन जाये । जाणणें तिकडे होये; । घटासरिसें भोंवत आहे । आकाश जैसें. ॥ ५९ ॥ चित्त माझें चंचळ । न राहे क्षण एक निश्चळ, । तेंही मींचि जाणे सकळ । जाणतें तेंचि मीं. ॥ ६० ॥ जैसा फुलांचा परिमळ । फुलीं असोनि फुलासि वेगळा, । तैसें मन, बुद्धि, चित्त, अहंकाराचा खेळ, । परि तयासि वेगळाचि कीं. ॥ ६१ ॥ हा स्थूल देह मरे; । पंचभूतें पांचाठायीं विखरे; । मग लिंगदेह उरे । निज कर्मासहित. ॥६२॥ तो पापपुण्यासहित सहजीं । पडे अज्ञान—कारणदेहामाजीं, । तेथूनि केलीं कर्में परि सहजीं । पावे स्वर्ग नरक. ॥ ६३ ॥ तो स्वर्गीं कां नरकीं । तेथिंचे देह घेउनियां कीं । मग मन, इंद्रियें, फांकी । भोगावयासीं ॥ ६४ ॥ तेथिंचा भोग सरे, । मग मृत्यु लोकीं अवतरे, । ऐसा शिणसी वा रे, । नाना पंथें. ॥ ६५ ॥ जैसें घटसंगें आकाश । भोंवत असे दाही दिशा । मन लिंग देहास । तैसा आत्मा तो. ॥ ६६ ॥ स्थूळ, सूक्ष्म, कारण, । जीवासि हेंचि बंधन, । म्हणौनि सोडवीत असे आपण । या देहापासूनि. ॥ ६७ ॥ स्थूळ देहाचा आकार, । मन चित्ताचा व्यापार, । अज्ञानाचा करी संहार । वळखे आपणा. ॥ ६८ ॥ तिहीं देहां वेगळा । होऊनियां निराळा, । जाणणें मींचि केवळ । ऐसा ध्यानस्थ. ॥ ६९ ॥ पंचभूतें पंचविस अंशाचें । स्थूल देह माझें वेंचे; । पंचविस कळांचें । लिंग देह माझें. ॥ ७० ॥ या दोहींसीं मींचि जाणे । तो मीं कवण? मीं मज नेणे; । मज नेणे म्हणौनि मींचि जाणे । तया नेणणियासी ॥ ७१ ॥ तरी मींचि जाणणें तें । नेणणें अज्ञान कारणदेह निरुतें; । ऐसियापरी आपणीयातें । करी देहा वेगळें. ॥ ७२ ॥ तया अज्ञानें गोंविलें, । लिंगदेहापाठीं लाविलें; । मग स्थूळदेह पावलें । चौऱ्यायशींलक्ष योनी. ॥ ७३ ॥ म्हणौनि मूळ अज्ञानासीं करी संहार । तंव राहिला स्थूळसूक्ष्माचा विचार; । मग तुटे येरझार । संसाराची; ॥ ७४ ॥ म्हणौनि व्हावें स्थूळसूक्ष्मदेहातीत. । त्रिभुवनीं निर्भय, निश्चित; । चुकलासि स्वर्गनरकपंथ । गर्भवासाचे. ॥ ७५ ॥ यालागीं तो ध्यानस्थ । आपण आपणा न्याहाळित, । क्षण एक दुश्चित । विसंबेना. ॥ ७६ ॥ नकरी

संनिधान कवणासीं, । बोलणे नावडे जनासीं, । आपला आपण मनासीं । सावचित्त. ॥ ७७ ॥ असे उदास कां घराचारीं, । कोणे एके व्यापारीं, । परी स्वरूप मनाभीतरीं. । विसरेना. ॥ ७८ ॥ जरी असला गृहस्थाश्रमीं । तरी उदास वर्ते संसारधर्मीं, । त्यासि अज्ञानाची भ्रमी । बांधो न शके. ॥ ७९ ॥ सुख लागलिया मनीं नेघे संतोष, । दुःख जालिया मनीं नेघे त्रास, । अखंड ब्रह्मरस । सेवीत सदा. ॥ ८० ॥ लाभ जालिया अभिलाष, । हानि जालिया न करी शोक; । जालियाचा संतोष मरणाचें दुःख । नेघे मनीं. ॥ ८१ ॥ अनंत वेळां हें शरीर जालें, । मिति नाहीं इतुकिया वेळा नासलें, । परी आत्मरूप उरलें । अविनाश म्हणौनियां. ॥ ८२ ॥ पुरुष फाडी दिंडें वस्त्रांचीं, । परी आपण स्वयें तैसाचि; । तैसीं सांडूनि कलेवरें देहाचीं । नवीं सरिसीं घेत जाये. ॥ ८३ ॥ अनंत प्रळय जाले । परी लिंगदेह असे उरलें; । तें धांवों लागलें । स्थूळदेहासीं. ॥ ८४ ॥ जंव लिंगदेह न तुटेचि । तंव संसार न चुकेचि; । जंव मूळ न तुटेचि । अज्ञान कारण. ॥ ८५ ॥ मीं स्वरूप निराकार, । मीं अक्षय, अमर, । जन्म मरणाचे भार । मज कायसे पां ? ॥ ८६ ॥ ऐसें सुख दुःख अनेक वेळां । भोगिता नाहीं कंटाळा, । म्हणौनि संसार चांडाळा । न लिंपे तूं. ॥ ८७ ॥ ऐसा सुटला जो मनीं । तो भोगितां बांधला कैसेनि ? । तो सावचित्त ध्यानीं । आत्मस्वरूपाचे. ॥ ८८ ॥ मनातें आवरी; । आणि इंद्रियांचे व्यापारीं । घडला भोग तो हरी । अर्पण करी पैं, गा. ॥ ८९ ॥ हस्तपादादिक चालती । मन असे ऐके निश्चितीं. । स्वरूपाचिये ज्ञप्तीं । बैसला असे. ॥ ९० ॥ हस्तपाद आंवरुनी ॥ बैसला असे आसनीं; । विचरत असे मनीं । तो दांभिक जाणावा. ॥ ९१ ॥ मन जिकडे जिकडे खेळे । तिकडे तिकडे मोकळें; । नुसधे झांकूनि डोळे । तो काय करी ? ॥ ९२ ॥ कोल्हाटी चाले नाडियावरी, । चक्रें भोंवतीं दोहीं करीं, । खर्ग हनुवटी वरी । धरिलें असे. ॥ ९३ ॥ इतुलिया ठायीं तो व्यापारी, । लक्षी खर्ग डोळियांवरी, । तैसें असोनि संसारीं । स्वरूप लक्षी सावचित. ॥ ९४ ॥ सर्वभूतीं आत्माराम । **नारायण हरी पुरुषोत्तम** । म्हणौनि न धरी सम विषम । कवणा जीवांसीं. ॥

॥ ९५ ॥ सर्वभूतांमाजि आपणासि देखे, । कां सर्व भूतें आपणामाजि वोळखे, । तो अवतरला अशेषें। परब्रह्ममूर्ति. ॥ ९६ ॥ स्थूळ, सूक्ष्म, कारण, । मीं नव्हे; ऐसें जाण, । सर्वभूतीं आपण । मींचि कीं. ॥ ९७ ॥ सर्व भूतांमध्यें जाणणें । तोचि मीं आपण । ऐसें सर्वभूतीं पाहणें । आपणासीं ॥ ९८ ॥ जागृतीं, स्वप्न सुषुप्तीं । मींचि जाणे सर्वभूतीं; । महाकारणीं तुर्येची स्फूर्ति । मजचि कळली. ॥ ९९ ॥ विश्व अवघीं पंचभूतें, । त्यामाजि जाणे तो मींचि निरुतें. । तेथें जे दिसतें । माझे देहीं ॥ १०० ॥ एके मृत्तिकेचे घट जाले, । अंतरीं आकाश एकचि कोंदलें; । तैसें पंचभूतांमाजि आत्मत्वें विस्तारलें । जगत्रय हें. ॥ १ ॥ म्हणौनि मजमधीं दिसे, । विश्वा वेगळा मीं नसे, । नर नारी परियसें, । सर्व मींचि कीं. ॥ २ ॥ अणुरेणुमात्रा पासुनी । ईश्वरपर्यंत विस्तारुनी । मींच नांदत असे त्रिभुवनीं । आत्मस्वरूप. ॥ ३ ॥ ऐसें शोधितां या वर्मीं । जो मिळाला परब्रह्मीं, । सुटला अज्ञानकर्मीं, । म्हणे ब्राह्मणी मुंताजि. ॥ ४ ॥ प्रकाशदीपिंची वोवी । आपण आपणासि दावी. । अज्ञानापासूनि उगवी । निमिषा माजीं. ॥ ५ ॥ इतिश्री गुरुशिष्य संवादे । महाकारणदेहनिरसनं नाम चतुर्थ प्रकरणं. । श्रीमज्जनार्दनार्पणमस्तु. ।

**श्री जनार्दन.**

आतां तत्पदाचा जगदीश्वर । मागें पुसिला होता विचार । तें तुज कथन करूं निर्धार; । एक चित्तें आइक, पां. ॥ १ ॥ जगदीश्वराचा देह । तें साकार ब्रह्मांड हें. । उत्पत्ति अवस्था पाहे । ब्रम्हांडींची ॥ २ ॥ तेथिंचा ब्रह्मा अभिमानी । नेत्रस्थान स्थूळ भोग दोन्ही; । हा प्रपंच रजोगुणी । बोलिजे हें. ॥ ३ ॥ दुसरें लिंगदेह तें हिरण्यगर्भ, जाण, । तेथें स्थिति अवस्था गुण । तेथिंचा अभिमानी विष्णु आपण । कंठस्थान भोग प्रविविक्त. ॥ ४ ॥ हा सत्वगुणाचा प्रपंच बोलिजे, । एकाग्र करुनि ऐकिजे, । बोलिजेल मनोभावें जें । तें परिस बापा. ॥ ५ ॥ तिसरें देह माया ॥ तेंचि जाण शिष्यराया । तेथें अवस्था प्रळया ॥ रुद्र अभिमानी. ॥ ६ ॥ हृदयस्थानीं निरानंद मूर्छना भोगिजे, । तमोगुणाचा प्रपंच बोलिजे. । स्थूळ, सूक्ष्म, कारण म्हणिजे । देहत्रय हें. ॥ ७ ॥ मूळप्रकृति तें महाकारण, । तेथें सर्वसाक्षी

हे खूण, । तेथें अभिमानी जाण । प्रत्यगात्मा तो. ॥ ८ ॥ तोचि बोलिजे सर्वेश्वर ॥ मीचि ब्रम्ह ऐसा त्याचा विचार; । तोचि बोलिजे आदिईश्वर । सृष्टिकर्ता. ॥ ९ ॥ मूर्ध्निस्थान तें । आनंदावभास भोग तेथें, । ऐसें बोलिजे निरुतें । चौथा देहीं. ॥ १० ॥ चौंदेहां वेगळें परियेसीं, । जिहीं जाणितलें आपणासीं, । मीं सर्वेश्वर साक्षी ऐसी । जेथूनि साक्षी उमटे तें ब्रह्म. ॥ ११ ॥ जें जें जाणावें । तितुकें तें नव्हे; । मग जाणणेंचि उरलें स्वभावें । तेंचि परब्रह्म गा. ॥ १२ ॥ जेथें जाणणेंचि उरे । तेथें जाणावया नाहीं दुसरें, । तेंचि परब्रह्म बा रे, । निरामय जें. ॥ १३ ॥ तूं प्रत्येक चैतन्य आत्मा, । तो पूर्ण चैतन्य परमात्मा, । दोहीं एकपणें होय ब्रह्म । निर्गुण निरामय जें. ॥ १४ ॥ आतां असो हा विचार, । सर्व घटीं सर्वेश्वर । नटोनियां चराचर । आपणचि नांदे. ॥ १५ ॥ आतां सांगों रहणी । ते धरुनियां अंतःकरणीं । जो राहे निर्वाणीं । तो ब्रम्हीं मिळाला. ॥ १६ ॥ जेणें मायामोह त्यागिला । तो वीतरागी जाला. । कां ध्यानस्थ राहिला । तो साधू पैं. ॥ १७ ॥ ध्यान म्हणिजे कैसें ?। अखंड स्वरूपीं मन असे, । क्षण एक न विसंबे जैसें । धनलोभिया तैसा. ॥ १८ ॥ तैसें जतन करी स्वरूपातें, । न्याहाळूनि आपणियातें, ॥ ठकचि होउनियां निरुतें । न्याहाळं ठाके. ॥ १९ ॥ तंव ज्ञानपणाचिया घरीं । आपआपणिया धरी । तन्मयसुखाचिया लहरी । विसर न टके. ॥ २० ॥ तेथें स्वरूपचि एकवटे । समाधि सुख घनवटे; । कांहीं नाठवे. नेटें । तन्मय जालें. ॥ २१ ॥ आपणचि आपणा उरे, । नाहीं जाणणेंचि दुसरें. । चित्त परब्रह्मीं मुरे । ब्रह्मानंदसागरीं. ॥ २२ ॥ तेथें इंद्रियें बुडालीं, । कुडी प्रेत होऊनि ठेली, । जाणीव लोपली । स्वरूपाची. ॥ २३ ॥ तेथें स्वरूपाचें स्फुरण । तोंचि जाणीव जाण; । तीस तूंच जाण । निजज्ञानें. ॥ २४ ॥ आपुलिये जाणिवेतें । ग्रासूनियां निरुतें । तूंचि उरलासि; तेथें । जाणैल कोण ? ॥ २५ ॥ विघरलें तूप जैसें । आपणचि थिजों जातसे, । मग परतोनियां असे । जैसें, तैसेंचि ॥ २६ ॥ आप आपणचि थिजणें; । तैसें तुझें जाणणें । एकवटलिया, नेणे । आणिकातें. ॥ २७ ॥ परतोनियां थिजे जाणीव, । मग जाणता तिये नाहीं भाव; । जाली जाणीव ना नेणीव । तें स्वरूपमय तूं. ॥ २८ ॥ मीं आप-

णियांसि नेणे ते नेणीव, । मीं नेणें म्हणौनि नेणिवेसि जाणीव; । ते जाणीव जयापासाव । तें तूं स्वयंभू विश्वरूप. ॥ २९ ॥ दिवादिवियांचा प्रकाश, । त्या प्रकाशांत अंधःकार बहुवस; । हें उपनिषदांसि पुस, । विचारीं पां. ॥ ३० ॥ प्रकाशें अंधकार नासे, । तो प्रकाश दिवियापासूनि असे; । तेंवि नेणीव, जाणीव दिसे । तुजपासाव. ॥ ३१ ॥ तुझा प्रकाश ते जाणीव, । ते जाणीव जाणे, गा, सर्व; । तेही तुजपासाव, । तूं स्वयें दीप. ॥ ३२ ॥ तुझी जे जेथें जाणीव, । ते पैं तुजपासाव, । तरी तुज वेगळा भाव । धरूं नये. ॥ ३३ ॥ बीजापासूनि जो अंकुरु, । तो बीजासि वेगळा नये करूं; । बीज नाहीं तेथें विस्तारु । कशाचा तो ? ॥ ३४ ॥ म्हणौनि शुद्ध जाणणियांची राशी, । तोचि तूं स्वरूप परियेसीं; । कां या इंद्रियें मनेसीं, । जाणे जो. ॥ ३५ ॥ जो जाणणें जाणणियांसि पाहत, । असे अखंड अनुभवित, । दुश्चित न होत, । असे ध्यानस्थ. ॥ ३६ ॥ मन जया जयासि जाणे, । तें तूं नव्हेसि आपण; । मनासही प्रकाशणें । तुजपासाव. ॥ ३७ ॥ जेणें सर्वांसि जाणितलें, । तें जाणणें तुजचि कळलें; । तें जाणणें आपुलें । रूप जाण. ॥ ३८ ॥ ऐसें जया होय ज्ञान, । तेथें हारपे अज्ञान; । चुकलें जन्ममरण, । गर्भवास, नाना याती. ॥ ३९ ॥ तें समरस होय स्वरूपीं, । नये संसारा पुनरपि, । आपला विस्तार आपण लोपी, । परब्रह्मचि होय. ॥ ४० ॥ एकदांचि समाधान नव्हे, । तेणें हळू हळू अनुभवावें; । तें आपणा आपण उगवे । अज्ञानापासूनि; ॥ ४१ ॥ परी नसंडावा संवाद । साठि घटिकांमाजी एक घटिका सावध, । तो पावेल ब्रह्मबोध । अनुभवितां, अनुभवितां. ॥ ४२ ॥ आतां बोलतां विस्तार, । पुढें पुढें होत असे पसर; । म्हणौनि आतां आवरूं । ग्रंथासि पैं. ॥ ४३ ॥ बीज तरि असे थोडें, । परि भूमिका विस्तारे बहुत पडिवाडें; । उगवे अज्ञानाचें कोडें । म्हणौनियां. ॥ ४४ ॥ नाहीं सांगितला बहुत प्रकार; । जो कां सकळांमध्यें सार, । जेणें फिटे अंधःकार, । तेंचि कथिलें असे. ॥ ४५ ॥ सकळ शास्त्रें पहावीं, । आणि गुरुमति ध्यावी; । त्यासि नपडे गोंवी, । अज्ञानाची. ॥ ४६ ॥ हें सर्वां सारांचें सार, । बीजांचें बीजाक्षर; । अनुभवितां जाय अंधःकार । निमिषार्धें. ॥ ४७ ॥ सकळ शास्त्रांचेनि मतें । आणि महावाक्यांच्या बळें होतें । तेंचि म्यां निरुतें । कथन केलें. ॥ ४८ ॥

तरि मज प्रत्यक्ष जालें, । आपणा आपण गवसलें; । म्हणौनि बोलिलें । प्रमाणेंसीं. ॥ ४९ ॥ तरि पाहें अनुभवितां । सांडूनि मनाची चिंता, । तुझा तूं गवससी आतां, । वेळ नलगतां पैं. ॥ ५० ॥ सांडूनि मंत्र, यंत्र, । अजपा, ध्यान, षट्चक्र; । आणिक साधनें सर्वत्र । न करीं, बापा. ॥ ५१ ॥ जें जें तूं जाणसी, । तितुकें कैसेनि होसी, । तुज तूं दिससी । कवणे बुद्धी? ॥ ५२ ॥ अंधार दाटला असे । तो एके तेजें निरसे; । तेजावांचूनि परियसें । कशानें जाईल? ॥ ५३ ॥ ज्ञानें नेटें पाटें । अज्ञान पैं न फिटे; । स्वरूप केंवि उमटे । हारपलें तें? ॥ ५४ ॥ येक आधारकमळ आकोंचोनि, । रेचक, पूरक त्राहाटूनि, । त्रिबंध देऊनि, । अनुहत ध्वनी राहिले. ॥ ५५ ॥ तेथें मन, चित्त समरसलें, । स्वयें स्वरूप प्रकाशलें, । निराकार उघडलें । ब्रह्ममय. ॥ ५६ ॥ एक मनपवनाचा ग्रास करिती, । तितुकेनाचि आनंद मानिती; । आम्हीं जाणीतलें म्हणती । परम तत्व. ॥ ५७ ॥ परि शुद्ध नेणती स्वरूपाची, । उर्मी नवजाय अज्ञानाची; । जंव शुद्धि नेणे त्वंपदाची । महावाक्यकथनें. ॥ ५८ ॥ जो नेणे महावाक्याचें कथन, । तो गुरुचि अज्ञान; । तेथें शिष्याचें दैन्य । कैसेनि जाय? ॥ ५९ ॥ महावाक्याची नेणे, गा, परी, । दृष्टी दावूनि कथन करी, । तो स्वयें स्वरूपबोध सर्व प्रकारीं । नेणेचि, गा. ॥ ६० ॥ दिसे म्हणौनि देखिजे, । कां ज्ञानत्वें जाणिजे, । अमुकें ऐसें म्हणिजे, । तें नव्हे, गा. ॥ ६१ ॥ आपणचि नाहीं देखिलें । त्या गुरूनें शिष्या काय दाविलें? । शब्देंचि थोतावलें । धीटपणें. ॥ ६२ ॥ आंधळ्याचा हात आंधळा धरी, । पाउला पाउला विटंबना थोरी, । दोघे पडिले गारीं; । काढावे कोणी? ॥ ६३ ॥ कीजेति नाना देवपूजनें, । तीर्थव्रतक्षेत्रदानें, । अतिथिब्राह्मण भोजनें, । मंत्रस्नान पैं; ॥ ६४ ॥ ऐसें करितां मनोभावें । त्याचें फळचि पावावें; । पारि जन्मावेगळें न व्हावें । एका आत्मज्ञानेंवांचूनियां. ॥ ६५ ॥ तें आत्मज्ञान कैसें? । स्थूळसूक्ष्मकारणदेहनिरासें । आपणचि होऊनि संतोषें । आपणाचि पैं. ॥ ६६ ॥ जेथे आपणचि न दिसे । तेथें काय साधित असे? । म्हणौनि सांडीं वायसें, । नाना मतें तें, गा. ॥ ६७ ॥ साधितां देहाचीं स्थानमानें, । पवनअभ्यास, नाना साधनें, । हें जाण सकळ खंडज्ञान । स्वयें स्वरूपावांचूनि. ॥ ६८ ॥ तें स्वयें स्वरूप प्रकाशे, ।

म्हणौनि पाहें पां विश्वासें; । जो आपण आपणियां दिसे । हे प्रकाशदीपीं. ॥ ६९ ॥ जें जें कथित मत । तें सत्य जाण, गा, समस्त; । तेथें जीवरूप होय ना अनंत । प्रकाशीं ज्ञान. ॥ ७० ॥ जितुकें ज्यासि दिसे, । तितुकें बोलती विश्वासें; । त्या अगोचर असे । जैसें तेसेंचि. ॥ ७१ ॥ आतां असो हे शब्दरचना. । बहु विस्तार कथवेना, । एकाग्र करूनियां मना । अभ्यासीं हा ग्रंथ. ॥ ७२ ॥ जैसें चालविसी आंघोळीव्रत, । शुचिस्नान शुचिर्भूत । प्रतिदिनीं उदो होत । दिनकरेंसीं; ॥ ७३ ॥ तैसें या ग्रंथासि । प्रतिदिनीं अभ्यासी, । तो होय स्वरूपेंसीं । एकरूप तत्वतां. ॥ ७४ ॥ हें अभ्यासासि कारण, । जें मन स्थिर करावें हेंचि निर्वाण; । हृदयीं करूनियां सांठवण । धरावें चित्तीं. ॥ ७५ ॥ ज्याचें मन स्थिर । त्यासि गंवसे साचार; । चंचळासि अंधार । निरसेचिना. ॥ ७६ ॥ बहुत नाहीं विस्तारिलें, । कारण तेंचि सांगितलें, । पाल्हाळ सांडिले । शब्द वाव. ॥ ७७ ॥ अहर्निशीं ध्यातां । ज्ञान होय त्वरिता, । बम्हणी मुंतोजी विनवी आतां, । प्रकाशदीप. ॥ ७८ ॥ नित्यानित्य हरिकीर्तन, । नित्यानित्य हरिस्मरण, । वेदशास्त्रपुराण । पढिन्नला सदा; ॥ ७९ ॥ तोचि एक पावन, । तोचि उत्तम जाण, । जो करी हें श्रवण । धन्य धन्य तो! ॥ ८० ॥ इति श्रीप्रकाशदीपे गुरुशिष्यसंवादे तत्पदनिरसनं नाम पंचमं प्रकरणं समाप्तम्.

---

# सिद्धसंकेत.

## ( श्रीरामजानकीसंवाद. )

श्रीसद्गुरुनाथाय नमः । श्रीआत्मारामायनमः । आतां विहंगमाची कथा । जानकी पुसे रघुनाथा, । ते परिसावी श्रोतां । जीवोद्धारिणी. ॥ १ ॥ श्रीराम म्हणे, " वो वल्लभे, । विहंगम आला जो नभें । फळाचेया लोभें । कर्म सांडोनि. ॥ २ ॥ जे ध्वनि अंतर्गत ज्योति । नादीं ठेवी श्रोत्रीं; । नेत्रीं पाहीं आकाशावरुती । तेजप्रभा. ॥ ३ ॥ भ्रुवांवरूनि देख । उभय दृष्टि करूनि येक, । अनिमेष पातीं राख । व्योमगर्भीं. ॥ ४ ॥ हा अभ्यास करितां । परमात्मा देखसी त्वरिता, । हे निराकाराची वार्ता । विरुळा जाणे. ॥ ५ ॥ सूक्ष्म तेजें आकाश । दुमदुमित भरलें असे; । तो आत्मा स्वयंप्रकाश । न्याहाळीं वेगीं. ॥ ६ ॥ अणुचेया सहस्रांशें । सूक्ष्म रूप पूर्ण दिसे, । तें उघड डोळां भासे । साधकांसि. ॥ ७ ॥ जेंवि सुवर्णाचा चुरा । तैसा प्रकार निराकारा, । कां बळें उडती तारा । अंबरीं प्रभा. ॥ ८ ॥ गगन भरी खद्योतक, । कीं प्रकाशले रत्नदीपक, । ऐसें तेज अमुप देख । दृष्टीपुढें. ॥ ९ ॥ दृष्टी भासे ज्वाळ, । कां उदेजती विजूकल्लोळ, । नाना नक्षत्रांचे गोंधळ । अनेक दिसती. ॥ १० ॥ कां चंद्रसूर्य उगवले, । गगनगाभां भरोनि ठेले, । कीं सूर्य अनंत प्रकाशले । दृष्टीपुढें. ॥ ११ ॥ उदित तारांगणें शोभती, । कीं ते दंडाकारें दिसती, । अर्धचंद्राकारें असती । नादबिंदुरूपी. ॥ १२ ॥ जेथें कांहींच नाहीं । तेथें हें दिसतसे पाहीं, । शून्याचेया डोहीं । नीर शून्यब्रह्म. ॥ १३ ॥ ऐसे रत्नकील फांकत, । कीं इंद्रनीळ झळमळित, । कीं मुक्ताफळें भरित । अंबर पूर्ण. ॥ १४ ॥ क्षणक्षणा होय पालट, । धरित नाना रूपें नट, । एक अनेकीं कोंदाट । पीत, श्वेत, आरक्त प्रभा. ॥ १५ ॥ नीळकृष्णरहित शोभा । पंचवर्णादिक नभा; । ऐसा विचित्र गाभा । भूतीं दावी. ॥ १६ ॥ ऐसें म्यां सांगितलें तुज । अलोलिक ब्रह्मतेज, । न्याहाळितां दिसे सुलभ, । सीतादेवि. ॥ १७ ॥ हे शुद्ध परंज्योति निर्मळ । गुरुमुखावीण अकळ, । पाहतां सुखाचा सुकाळ । जेणें होय. ॥ १८ ॥ पातें राखतां राखतां, ।

निरंतर अभ्यास करितां । होऊनि ठाहसी तत्वतां, । जनकतनये. ॥ १९ ॥ मनीं धरूनि विश्वास, । करूनि पाहें पां अभ्यास; । देखसील परमहंस । याचि डोळां. ॥ २० ॥ जेंवि स्वरूप देखावें असें । दृश्यरूप परियसें; । तरि त्या परतें देखणें नसे; । जाण, सीते. ॥ २१ ॥ देखों पाहसी अवयवाकार । सगुणरूप जें साकार, । तरि याहूनि सार । आणिक नाहीं. ॥ २२ ॥ जरि देखावें ऐसें । घेसील तूं मानसें, । तरि याहूनि नसे । प्रत्यक्ष कांहीं. ॥ २३ ॥ जया होवोनि देखसी तें जडें । रूपाकारें तें थोकडें; । हें सूक्ष्म, परि वाडें । सकळांहोनि ॥ २४ ॥ दृश्य, अदृश्य रूप याचें, । दिसे न दिसे, परि असे साचें. । हें देखणें दृष्टीचें । याहूनि नाहीं. ॥ २५ ॥ हें नव्हे पृथ्वी, ना कठीण; । आप न्हवे, ना द्रवपण; । तेज न्हवे, ना उष्ण । अग्निरूप. ॥ २६ ॥ वायु न्हवे, ना चंचळ; । आकाश न्हवे, ना पोकळ; । सूर्य नव्हे, ना सीतळ । चंद्रमाही. ॥ २७ ॥ हें पंचभूत साभास, । ना नव्हे याचे पंचवीस अंश; । आपेंआप स्वयंप्रकाश । सकळांतीत. ॥ २८ ॥ हें पंचभूतीं न मिळे, । ना आकाशाही नातळे; । अवघेयांहूनि निराळें । निजरूप हें. ॥ २९ ॥ हें पाहतां दिसे, । मग निरंतर प्रकाशे, । रात्रंदिवस असे । दृष्टीपुढें. ॥ ३० ॥ हें पिंडब्रह्मांडअतीत, । ब्रह्म, सूर्य बिंबत । स्वयें तेजें सदोदित । स्वयंप्रकाश. ॥ ३१ ॥ या आड अपार असे, । तेणें कोणा न प्रकाशे. । तटस्थ खुंटली दृष्टि प्रवेशे । तरिच उघड होय. ॥ ३२ ॥ अनंत चंद्रसूर्यांच्या बिंबीं । स्वस्वरूप भरलें नभीं, । नामरूप दावी परि स्वयंभीं । एकचि असे. ॥ ३३ ॥ ब्रह्मा तो तारकरूपी, । विष्णु तो दंडकस्वरूपी, । रुद्र तो कुंडलरूपी । जाण, प्रिये. ॥ ३४ ॥ वर्तुळाकार तो ईश्वर । ज्योति सदाशिव निर्धार, । आणि आभासे सर्पाकार । तो शेषशयन नारायण. ॥ ३५ ॥ दिसती नाना तेजगुंडाळें । नानारंगकीळें । स्वस्वरूप सगळें । येकचि अनेक. ॥ ३६ ॥ उत्पत्ति होतां न उपजे, । स्थितीसंगें न माजे, । प्रळयसंगीं न बुजे, । अविनाश जें. ॥ ३७ ॥ पृथ्वी विरे उदकांत, । उदक आटे तेजांत, । तेजातें सोकी वात । मारुत पैं. ॥ ३८ ॥ पवना गिळी आकाश, । आकाशाचा शून्य करी ग्रास, । शून्यास खाय स्वप्रकाश । हें ब्रह्मतेज. ॥ ३९ ॥ ऐसें उर्वरित संचलें । हें दृष्टी ज्याणें देखिलें, । तयाचीं वंदिती पाउलें । सकळ देव." ॥ ४० ॥ तंव

सीता म्हणे, " प्राणनाथा, । हे अपूर्व सांगितली कथा, । याची नेणोंचि वार्ता । काय ऐसें म्हणऊनि. ॥ ४१ ॥ आतां एक पुसेन; कमळनयना, । अयोध्यापति, माझेया प्राणा, । रामराया, तुज शरण । आलें, हो स्वामी. ॥ ४२ ॥ या स्वरूपाचा अभ्यास । कैसा कीजे आंत प्रवेश, । जें पाविजे परमहंस । पूर्ण चैतन्य ?" ॥ ४३ ॥ तंव राम म्हणे, "वो सुंदरी, । ऐकें, जिवलगे प्राणेश्वरी; । जें पुशिलें उत्तरीं । तया चित्त देईं. ॥ ४४ ॥ याचें करितां साधन । धरिजे एकांतस्थान, । जेथें सदा भेटे जन । तो संग वर्जावा. ॥ ४५ ॥ वीट, मोह, ममता नसावें सकळ, । व्हावें अंतःकरण शुद्ध, निर्मळ; । क्षुधे तृषेचा हळाळ । शांत करावा; ॥ ४६ ॥ मग धरावें ध्यान । भ्रूवरि लक्षून, । पातीं स्थिर, नयन । आकाशगर्भीं. ॥ ४७ ॥ मन-नयनां येकांत करावा, । प्रेमभाव हृदयीं धरावा, । सत्य विश्वास मानावा । निश्चयेसीं. ॥ ४८ ॥ दिसेल इंदुभास्करांचे परी । तोचि उभय दृष्टी धरीं, । त्यांत तूं प्रवेश करीं । निश्चळ मनें. ॥ ४९ ॥ मयोरपत्रावरील डोळे । तैसीं दिसती जें वर्तुळें, । तयांमध्यें जें नीळें । तें रूप माझें. ॥ ५० ॥ तयांत खोंवोनि दृष्टि, । तें अंजन सुवावें नेत्रपुटीं; । मग उघडेल पेटी । ब्रह्मतेजाची. ॥ ५१ ॥ ध्यानीं चित्त स्थिरावेल । तया अखंड तेज प्रकाशेल, । मन तदाकार होईल । विसरलेनि देहातें. ॥ ५२ ॥ कल्पनारूप जें मन, । जें कल्पी तेंचि पालटे जाण, । म्हणोनि हितसाधन । त्यासिच बोलिजे. ॥ ५३ ॥ तें ध्यानीं लाविलें, । स्वरूपीं एकाग्र झालें, । स्थूळ देहासि विसरलें । जागृतीसहित; ॥ ५४ ॥ आणि देखावें जंव स्वप्न । तंव स्वरूपीं लागलें मन, । दृढावलें अनुसंधान, । तेथ लिंगदेह विसरला. ॥ ५५ ॥ जेथें देहद्वय नाहीं । तेथें अज्ञान कैचें ? पाहीं ? । सुषुप्तीस ठाव नाहीं । स्वप्रकाशें. ॥ ५६ ॥ जेथें ज्ञान विवळली, । तुर्या प्रगटली, । आत्मसिद्धि साधली । साधकांसि; ॥ ५७ ॥ आपआपणा प्रकाशलें । ज्ञान घन देखिलें, । सायुज्यता पावलें । परब्रह्मीं. ॥ ५८ ॥ आपण वोळखिलें परब्रह्म । सर्वां भूतीं सम; । ............... । सांपडलें अनुभवियांसि. ॥ ५९ ॥ पाहतां पाहतां काय झालें ? । मधील दर्शन गेलें. । दिसणें, देखणें येकवटलें । समरसचि तो. ॥ ६० ॥ श्रुतिवाक्यवर्तमान शुद्ध ज्योति सनातन, । ऐसें बोलिलें

वेदवचन; । तें डोळां घालोनि अंजन । साधिला निधि. ॥ ६१ ॥ हें नव्हे सलोकसमीपता, । ना स्वरूपसगुणसायुज्यता, । ज्योतिज्योतितन्मयता । मिळणी झाली. ॥ ६२ ॥ **आदित्यवर्णं तमसः परस्तात्** । ऐसें ब्रह्मतेज अद्भुत । स्वयंज्योतिप्रकाशित, । मिळणी झाली तेथ, । प्राणेश्वरी. ॥ ६३ ॥ जैसा दीप मिळे दीपमाळे, । तेथ समरसलें तेज बंबाळें; । तैसे पृथक्चैतन्यपूर्णचैतन्यसोहळे । ऐक्यभावाचे. ॥ ६४ ॥ तेथ मिळोनि वेगळें होणें, । वेगळें होवोनियां मिळणें, । हें पद लाहणें, । अनुभवीं, सीते." ॥ ६५ ॥ तंव सीता म्हणे, " विश्वात्मया नारायणा, । सकळ जीवांचिया उद्धरणा, । प्रसन्न झालासि, जानकीरमणा, । ब्रह्मरसीं निवविसी. ॥ ६६ ॥ ब्रह्मानंदपुतळा; । कवण जाणे तुझी लीला, । परमात्मया, घननीळा, । रामचंद्रा ? ॥ ६७ ॥ मी जन्मोजन्मीं तुझी दासी. । तूं निरंतर माझे मानसीं. । तूं स्नेहाळ, स्नेहाची राशी, । परमपुरुषु. ॥ ६८ ॥ जें कोणासिच न कळे । तयासि देखती हे डोळे. । होती आनंदाचे सोहळे । साधकांसि. ॥ ६९ ॥ '**स्वयंब्रह्मेति**' जाण ती श्रुति; । तया खगर्भीची स्थिति । दाखविली मजप्रति, । प्राणवल्लभा. ॥ ७० ॥ आकाशांत पराकाश, । त्यांत सूक्ष्म महदाकाश, । तया परतें तत्त्वाकाश, । सूर्याकाश स्वयंज्योति. ॥ ७१ ॥ एवं शुद्ध, निर्मळ, निराभास; । त्यांत अनुपम्य प्रकाश, । ऐसें आकाशांत आकाश । तिसरें कोटिकळाज्योति. ॥ ७२ ॥ तयांत सोज्वळ चवथें, । पांचवें जाणितलें निरुतें; । ग्रासिलें कोटिसूर्यांतें । परब्रह्म जें. ॥ ७३ ॥ स्वयंज्योति प्रकाश । आपेंआप जो निराभास । करोनियां सकळ भानूंस, । अविनाश परमतत्त्व. ॥ ७४ ॥ हें देखावया दिव्यदृष्टि । तुवां दिधली, जगजेठी. " । म्हणोनि चरणा लागली गोरटी । लावण्यदीपिका. ॥ ७५ ॥ " जी, तूं सकळ विदेहांची खाणी, । अनुपम्य-सुंदरा, कोदंडपाणि. । हृदयीं लाविली लावणी । ज्ञानरत्नांची. ॥ ७६ ॥ ऐसीं अंबरांत अंबरें । दाविलीं सूक्ष्माकारें; । तंव तुझेनि जग उद्धरे । आत्मेया रामा. ॥७७॥ शून्याच्या शेवटीं । तुझेया रूपाची दाटी; । तेथ माझेया दृष्टी । रिघु केला. ॥ ७८ ॥ पाहतां पाहतां तटस्थ । हारपलें तुझे ठायीं चित्त, । मी माझें न स्मरत । निवालिया." ॥ ७९ ॥ ऐसें बोलतां तिये वेळीं । डोळस जनकाची बाळी । राहिली चित्रींची पुतळी । तटस्थ जैसी. ॥ ८० ॥ हालेना पातें,

अवघें देखिलें तेजाकार । स्वयंजोति. ॥ ८१ ॥
स्थिर । निहाळितां अपरंपार; । अवघें देखिलें तेजाकार । स्वयंजोति. ॥ ८१ ॥
रत्नाचा कुंभ बुचकळिला । बाह्यांतरीं तेजें कोंदला, । आकार विरता
झाला, । अवघें तेंचि. ॥ ८२ ॥ तैसें सीतेसि झालें, । अवघें ज्योतिर्मय
प्रकाशलें, । अंतर हारपलें । पाहतांपणेंसीं. ॥ ८३ ॥ मग पाहणें न पा-
हतां, । ध्यान न ध्यातां, । ध्येयचि होऊनि तत्वता । राहिली ते. ॥ ८४ ॥
मग आप, पर न स्मरे, । तेथ काय आठविजे दुसरें? । सीतेसि ग्रासिलें
परात्परें । आपण पें रामें. ॥ ८५ ॥ मी, माझें नाठवे, । स्फूर्ति
शोषिली देवें, । हें ज्याचिया अनुभवा ये । तोचि साधु. ॥ ८६ ॥
मग राम म्हणे जानकी । निवाली तन्मय सुखीं; । आपलें निज होऊनि सुखीं ।
उरली आपण. ॥ ८७ ॥ आतां इसीं चेइरें करूं । अवताराचा संपाद धरूं ।
मारावा असे दशशिरु । इचेनि आंगें. ॥ ८८ ॥ हे तंव राहिली आपले
रूपीं, । समरसली आपेंआपीं, । ............... । ते कासेया चेईल? ॥ ८९ ॥
मग समुद्रीं जैसी लहरी । हेलावूनि काढिली बाहेरी, । तैसी थापटूनि चेवन
करी । निज वल्लभेसि. ॥ ९० ॥ मग ते ज्ञप्तिघनीं । राहिली होती उन्मनी, ।
ते तुर्यपणातें येऊनि । सर्वसाक्षिणी झाली. ॥ ९१ ॥ सुषुप्तिप्रळयांची
जवनिका सारूनि, । स्वप्नस्थिति लंघोनि, । जागृति, उत्पत्तिहोऊनि ।
नेत्र स्थानीं आली. ॥ ९२ ॥ तत्वीं हेळाव स्फुरली, । भिन्न म्हणोनि उभी
ठेली, । पुढती इच्छा धरिती झाली ॥ रामीं अंतर्बाह्यें. ॥ ९३ ॥ मग गुणांचेनि
मेळें । अंतःकरण धरीती तिये वेळे; । प्राणांचेनि खेळें । इंद्रियद्वारासि आली.
॥ ९४ ॥ राम म्हणे, "सीते, सीते," । तंव नेत्र उघडी त्वरितें. । पाहूं लागली
भंवतें, । तंव श्रीगुरुमुर्ति सन्मुख. ॥ ९५ ॥ मग जयजयकारें बोलिली, ।
रुळे रघुनाथाचे पाउलीं. । म्हणे, "मज रूपासि आणिली, । नेणों काय
झालींय. ॥ ९६ ॥ मी चेती, ना निजेली, । आंत बाहिर चिंता हारपली, ।
आठव ना विसर, झाली । तटस्थ दशा. ॥ ९७ ॥ तरि सुषुप्ति न्हवे,
दातारा, । ज्ञानघनानंदाचे वोवरा, । चैतन्यघन दाटलें सेजारा । आंत
होतें, ॥ ९८ ॥ ते गोडी सांगतां । पराचि खुंटे तत्वता; । मा वैखरी
अनुवादतां । रिघु कैंचा? ॥ ९९ ॥ तें दाखविलें मज सुख, । केलें पवित्र,
निर्दोख; । कवण कीजेल लेख । आनंदाचें? ॥ १०० ॥ परि तया गोड
उरलें, । अमृत स्वादितां वेंचलें, । परि जिव्हे खादलें, । स्वाद उरे. ॥ १ ॥